# प्रस्तावना

सुमारें दोन अडीच तपांपूर्वी परक्या राजवटींत या देशांतील निरनिराळ्या विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांत देशी भाषा व वाङ्मय यांचा प्रवेश झाला. आतां 'स्व'राज्यांत देशी भाषांचा शिक्षणाचें माध्यम म्हणून स्वीकार होत आहे. या पालटलेल्या परिस्थितीचा परिणाम म्हणजे देशी भाषांत नित्य नव्या नव्या पाठ्यपुस्तकांची भर पडत आहे. अलिकडे एफ्. वाय्. च्या अभ्यासक्रमांत मराठी विषयाचा अंतर्भाव झाला आहे. एफ. वाय्. च्या अभ्यासाचा अवधि अवघा एक वर्षाचा आहे. तेव्हां तेवढ्या अल्प काळांत, विद्यार्थ्यांना प्राचीन आणि अर्वाचीन मराठी कवितेची तोंडओळख व्हावी, या दृष्टीनें प्रस्तुत ' प्रवाहिनी ' हा कवितासंग्रह तयार केला आहे.

मराठी विषयाचा विचार करतांना एक गोष्ट चटकन् लक्षांत येते ती ही कीं, मराठीला जसें प्राचीन तसेंच अर्वाचीन वाङ्मयीन पद्य आहे. परंतु वाङ्मयीन गद्य केवळ अर्वाचीन आहे. ज्याला प्राचीन गद्य असें आज संबोधण्यांत येतें तें वास्तविक व्यावहारिक व प्रासंगिक गद्य आहे. त्याचें स्वरूप वाङ्मयीन नाहीं. त्यांत क्वचित् साहित्यिक सौंदर्याच्या छटा आहेत इतकेंच ! मराठी गद्याची घटना अगदीं अलिकडली म्हणजे इंग्रजीच्या राजवटींतली आहे. तेव्हां काळाच्या दृष्टीनें विचार केला तर पद्याची परंपरा प्राचीन आहे. अर्थात् पद्याचें संकलन सिद्ध करतांना जवळ जवळ साडेसातशें वर्षांचा कालखंड समोर ठेवावा लागतो. उलट गद्याच्या संकलनासाठीं केवळ दीडशें वर्षांचाच कालखंड प्रामुख्यानें पुढें असतो. तेव्हां अभ्यासाच्या एक वर्षाच्या अवधींतला गद्याचा अर्धा काळ वगळून पद्याचें पुस्तक सिद्ध करणें आवश्यक व अनिवार्य असतें. प्रस्तुत पुस्तक हा त्याच परिस्थितीचा परिपाक आहे.

या संग्रहासाठीं कवी आणि कविता यांची निवड करतांना मराठी पद्याचे निरनिराळे कालखंड आणि कवितांचें स्वरूप यांचा विचार प्रामुख्यानें केला आहे. मराठी पद्याच्या पहिल्या कालखंडांत संतांचा समावेश होतो. त्यांच्या काव्याचें स्वरूप पवित्र व सोज्वळ आहे. या कालखंडांतील संतांत ज्ञानेश्वर, एकनाथ,

तुकाराम व रामदास यांना विशेष मान आहे आणि त्यांच्या कवितांना विशेष महत्त्व आहे. या चार संतांच्या चार ग्रंथांचा महाराष्ट्रांत आदर असून परंपरेनें त्यांच्या वाणीला वेदवाणीची महति प्राप्त झाली आहे. तेव्हां या संग्रहांत आरंभीं त्यांच्या वाणीला स्थान दिलें आहे. त्यांच्या कवितांतून जे उतारे वेंचले आहेत ते शक्यतोंवर साधे, सरळ व सोपे वेंचले आहेत. त्याच्या उताऱ्यांचा अभ्यास करतांना क्वचित् जुन्या शब्दाच्या अर्थाची अडचण उद्‌भवते. ती लक्षांत घेऊन शेवटीं त्यावर भरपूर टिपा दिल्या आहेत

मराठी पद्याच्या दुसऱ्या कालखंडांत आख्यानक कवी अंतर्भूत होतात. मुक्तेश्वर हा या कवींचा मोहरा होय. तो महाराष्ट्र स्वराज्योन्मुख असतांना शिवपूर्वकाळांत होऊन गेला. तुकाराम आणि रामदास यांच्या अगोदर तो झाला. परंतु त्याच्या कवितेचें कथात्मक स्वरूप लक्षात घेऊन या पुस्तकात त्याला तुकाराम–रामदासानंतर बसवलें आहे. कारण त्यापुढील रघुनाथ पंडित, वामन पंडित आणि मोरोपंत यांच्या आख्यानक कवितांशीं त्याच्या कवितेचें स्वरूप सुसंगत दिसते. या कथाकवींच्या कवितांची उभारणी भारत व भागवत या बृहत्‌काव्यातील कथानकांच्या आधारावर झाली आहे. त्या कथा सर्वश्रुत असल्यामुळें टिपांत दिल्या नाहींत.

यानंतरचा तिसरा कालखंड शाहिरांचा होय. प्रस्तुत पुस्तकांत एकाहि शाहिराला अथवा त्याच्या कवितेला जागा दिली नाहीं. कारण प्रेम आणि पराक्रम यांवर आधारलेल्या त्याच्या लावण्या आणि पोवाडे यांना विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमांत महत्त्व नाहीं. लावण्यातील शृंगार हा अनेक वेळां उत्तान असल्यामुळें पाठ्यपुस्तकात त्या घेता येत नाहींत. पोवाड्यांत वीररस असतो. परंतु पोवाड्याचें स्वरूप श्राव्य आहे, पाठ्य नाहीं. पोवाडे ऐकण्यासाठीं रचलेले असतात, आणि ते ऐकत असतानाच त्याच्यांतील साहित्यिक सौंदर्याचा साक्षात्कार होत असतो. त्याचा अंतर्भाव खरोखर लोकसाहित्यांत होतो. तेव्हां या पाठ्यपुस्तकांत त्यांना घातलें नाहीं.

संतसाहित्यापासून सुरू झालेला प्राचीन मराठी कवितेचा काळ शाहिराच्या कवितेपाशीं संपतो. यापुढचा काळ अर्वाचीन मराठी कवितेचा होय. हा काळ उण्यापुऱ्या दीडशें वर्षांचा आहे. अभ्यासाच्या सोयीसाठीं याचे तीन खंड पाडतां येतात. पहिला इ. स. १८८५ पूर्वीचा अव्वल इंग्रजींतील शास्त्री-पंडितांच्या कवितेचा कालखंड, दुसरा इ. स. १९२० पर्यंतचा केशवसुतादि

परिवर्तनवादी प्रतिभासंपन्न कवींचा कालखंड आणि तिसरा प्रचलित कवितेचा कालखंड. या तिसऱ्या कालखंडाचा पूर्वार्ध इ. स. १९४० च्या सुमारास संपतो व उत्तरार्धास प्रारंभ होतो. प्रवाहिनींत पहिल्या व तिसऱ्या कालखंडाच्या उत्तरार्धातील कवींना व त्यांच्या कवितांना स्थान दिलें नाहीं. कारण अभ्यासाच्या एका वर्षाच्या अवधींत सारे कवि आणि त्यांच्या कविता यांच्या रसग्रहणास अवकाश मिळाला नसता. याशिवाय उत्तरार्धातील कवींचें कवितालेखन अजून चालू असल्यामुळें आतांच त्यांच्या कवितांचें मोजमाप करतां येत नाहीं. तेव्हां या काळाच्या दुसऱ्या कालखंडांतील केशवसुत आणि तांबे या दोघां युगप्रवर्तक कवींच्या निवडक कविता हा संग्रहांत घेतल्या असून त्यांच्यापेक्षां वयानें लहान असणाऱ्या परंतु त्याच कालखंडांत समाविष्ट होणाऱ्या गोविंदाग्रज आणि बालकवि या सर्वमान्य कवींच्या कांहीं वेंचक कवितांना स्थळ दिलें आहे. तिसऱ्या कालखंडांतील कवींपैकीं केवळ माधव जूलियन् यांच्याच कविता या संग्रहासाठीं निवडल्या आहेत. कारण या कालखंडांतील समवयस्क नामवंत कवींच्या कवितांवर त्यांच्या कवितेचा जसा ठसा उमटला आहे तसा तो इतर कुणाचाहि उमटलेला नाहीं. सारांश, एका वर्षाच्या अल्प अवधींत एका दृष्टिक्षेपांत ज्यांच्या अजरामर काव्यकृतींचें सम्यक् दर्शन घडेल असे आठ प्राचीन कवी आणि पांच अर्वाचीन कवी निवडून त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण वेंच्यांना मीं या कवितासंग्रहांत संग्रहीत केलें आहे. बीजांवरून फळांची परीक्षा या न्यायानें या वेंच्यांवरून विद्यार्थ्यांना एकंदर मराठी कवितेचें आकर्षक व उज्ज्वल स्वरूप लक्षांत येईल अशी अपेक्षा आहे.

या कवितासंग्रहाकरितां मीं ज्याप्रमाणें मान्यवर कवींची निवड केली आहे, त्याचप्रमाणें त्यांच्या कवितांतले जे उतारे निवडले आहेत, तेहि सर्वांच्या ओळखीचे व अनेकांनीं ऐकलेलेच निवडले आहेत. कारण कित्येकदां अतिपरिचयामुळें या कवितांतील रसास्वादाकडे रसिकाचें चित्त जसें वेधावें तसें वेधत नाहीं. तेव्हां विद्यार्थिदशेंत त्यांचा आस्वाद व आनंद घेतल्यास पुढील आयुष्यांत मराठी कवितेची त्यांची अभिरुचि कायम राहील अशी माझी श्रद्धा आहे. निवडलेले उतारे विस्तारानें लहान आहेत. अनेक उताऱ्यांतील अनवश्यक व रसहीन भाग मीं मुद्दामच गाळले आहेत आणि उतारे थाटोपशीर केले आहेत. त्यामुळें ते विद्यार्थ्यांना कंटाळवाणे वाटणार नाहींत. टिपांत आधीं उताऱ्याचा संदर्भ दिला असून आरंभीं एकंदर उताऱ्याची रूपरेषा व आशय दिला आहे. त्यामुळें रसास्वादास साहाय्य होईल अशी आशा आहे.

निरनिराळ्या उताऱ्यांचीं वृत्तें आणि त्यांतले अलंकार यांची सविस्तर माहिती टिपांत सहेतुकच दिली नाहीं. कारण संतांचें साहित्य हें बहुधा ओवी व अभंग या अक्षरसंख्यांक छंदांत असून ते कळण्यास अतिशय सुलभ आहेत. मोरोपंतांची आर्याहि महाराष्ट्रांत घरोघर पसरली आहे. तिच्यांतील मात्रांची मोडणी सहज समजण्यासारखी आहे. अर्वाचीन कवींच्या कविता 'चाली' वर आहेत. त्या 'चाली' लोकप्रिय आहेत. त्या कविता वाचून त्यांतला रस चाखण्यांत जी गोडी आहे ती त्यांच्या 'चाली'चें रुक्ष मात्रामापन करण्यांत नाहीं. कचित् एखाद्याला त्या विषयात रुचि असल्यास तो स्वतः तसा प्रयत्न सहज करूं शकतो. राहता राहिली रघुनाथ आणि वामन या दोघा पंडितकवींची कविता. त्यांच्या कवितांत वृत्तांची विविधता आहे. त्याचप्रमाणें त्यांच्या कवितांत अलंकारांची विपुलता आहे. प्रस्तुत संग्रहांतील टिपांत मीं कचित् अलंकारांचा नामनिर्देश केला आहे. परंतु वृत्तें व अलंकार यांच्या बाबतींत एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती ही कीं, त्यांची माहिती केवळ वाचून समजत नाहीं. ती विद्यार्थ्यांना वर्गात प्रत्यक्ष प्रयोगानें शिकवावी लागते. तेव्हां तें कार्य मीं प्राध्यापकांवर सोंपविलें आहे. शिवाय कवितेच्या अभ्यासाचा मुख्य उद्देश रसग्रहण हा आहे. तेव्हां त्याकडे या संग्रहांत विशेष लक्ष दिलें असून वृत्त, अलंकार इत्यादि गौण विषयाकडे तात्पुरतें लक्ष दिलें आहे.

शनिवार दिनांक ९ जून १९५६
अमरावती.

**भवानीशंकर पंडित**

## दुसऱ्या आवृत्तीचे चार शब्द

प्रवाहिनीची ही दुसरी आवृत्ति म्हणजे पहिल्या आवृत्तीचें पुनर्मुद्रण आहे. पहिल्या आवृत्तींत जे मुद्रणदोष नजरचुकीनें राहिले होते, ते या आवृत्तींत सुधारले आहेत. महाराष्ट्र-साहित्य परिषद, पुणें आणि सागर विद्यापीठ, सागर यांनीं आपापल्या परीक्षांच्या अभ्यासक्रमांत पाठ्यपुस्तक म्हणून प्रवाहिनीचा अंतर्भाव केला याबद्दल मी त्या संस्थांचा आभारी आहे.

नागपूर–अजनी
शनिवार दि. २१ मार्च १९५९

**भवानीशंकर पंडित**

# अनुक्रमणिका

आधुनिक कवी :

## १. रसिकांस—

जैसें शारदियेचिये चंद्रकळे— माजीं अमृतकण कोंवळे
ते वेंचिती मनें मवाळें चकोरतलगें. १

तियांपरी श्रोतां अनुभवावी हे कथा
अति हळुवारपण चित्ता आणुनियां २

हें शब्देंवीण संवादिजे इंद्रियां नेणतां भोगिजे
बोलाआधीं झोंबिजे प्रमेयासी ३

जैसे भ्रमर परागु नेती परी कमळदळें नेणती
तैसी परी आहे सेविती ग्रंथीं इये ४

कां आपुला ठावो न सांडितां आलिंगिजे चंद्रु प्रगटतां
हा अनुरागु भोगितां कुमुदिनी जाणे ५

ऐसेनि गंभीरपणें स्थिरावलेनि अंतःकरणें
आथिला तोचि जाणे मानूं इये ६

अहो अर्जुनाचिये पांती जे परिसणेया योग्य होती
तिहीं कृपा करूनि संतीं अवधान द्यावें ७

हें सलगी म्यां म्हणितलें चरणांलागोनि विनविलें
प्रभू सखोल हृदय आपुलें म्हणौनियां ८

जैसा स्वभावो मायबापांचा अपत्य बोले जरी बोबडी वाचा
तरी अधिकचि तयाचा संतोष आथी ९

तैसा तुम्हीं मी अंगिकारिला सज्जनीं आपुला म्हणितला
तरी उणें सहजें उपसाहला प्रार्थूं काई १०

परी अपराधु तो आणीक आहे जे मी गीतार्थु कवळूं पाहें
ते अवधारा विनवूं लाहें म्हणौनियां ११

## २. संत

जो सर्वभूतांच्या ठायीं  द्वेषातें नेणेंचि कहीं
आप परु नाहीं  चैतन्या जैसा  १
उत्तमातें धरिजे  अधमातें अव्हेरिजे
हें कांहींचि नेणिजे  वसुधा जेवीं  २
कां रायाचें देह चाळूं  रंका परौतें गाळूं
हें न म्हणे कृपाळू  प्राणु पैं गा  ३
गाईची तृषा हरूं  कां व्याघ्रा विष होऊनि मारूं
ऐसें नेणेचि गा करूं  तोय जैसें  ४
तैसी आघवियांचि भूतमात्रीं  एकपणें जया मैत्री
कृपेसी धात्री  आपणचि जो  ५
आणि मी हे भाषु नेणे  माझें कांहींचि न म्हणे
सुख दुःख जाणणें  नाहीं जया  ६
तेवींचि क्षमेलागीं  पृथ्वीसीं पवाडु आंगीं
संतोषा उत्संगीं  दिधलें घर  ७
वार्षियेवीण सागरु  जैसा जळें नित्य निर्भरु
तैसा निरुपचारु  संतोषी जो  ८
वाहूनि आपुली आण  धरी जो अंतःकरण
निश्चया साचपण  जयाचेनि  ९
जीवु परमात्मा दोन्ही  बैसोनियां ऐक्यासनीं
जयाचियां हृदयभुवनीं  विराजती  १०
ऐसा योगसमृद्धि  होऊनि जो निरवधि
अर्पी मनोबुद्धि  माझ्याठायीं  ११
आंतु बाहेरि योगु  निर्वाळलेयाही चांगु
तरि माझा अनुरागु  सप्रेमु जया  १२

## ३. पसायदान

आतां विश्वात्मकें देवें | येणें वाग्यज्ञें तोषावें
तोषोनि मज द्यावें | पसायदान हें ॥ १ ॥
जे खळांची व्यंकटी सांडो | तयां सत्कर्मीं रती वाढो
भूतां परस्परें पडो | मैत्र जीवाचें ॥ २ ॥
दुरिताचें तिमिर जावो | विश्व स्वधर्मसूर्यें पाहो
जो जें वांछील तो तें लाहो | प्राणिजात ॥ ३ ॥
वर्षत सकळमंगळीं | ईश्वरनिष्ठांची मांदियाळी
अनवरत भूतळीं | भेटो तयां भूतां ॥ ४ ॥
चलां कल्पतरूंचे अरव | चेतनाचिंतामणीचें गांव
बोलते जे अर्णव | पीयूषाचे ॥ ५ ॥
किंबहुना सर्वसुखीं | पूर्ण होऊनि तिहीं लोकीं
भजिजो आदिपुरुखीं | अखंडित ॥ ६ ॥

## ४. संस्कृत आणि मराठी

संस्कृत वंद्य प्राकृत निंद्य हे बोल काय होती शुद्ध
हा ही अभिमानवाद अहंता अशुद्ध परमार्थी ॥ १
मोलें भूमि खणितां वैरागरीं अवचटें अनर्घ्य रत्न लाभे करीं
तें रत्न सांपडल्या केरीं काय चतुरीं सांडावें ॥ २
तेवीं संस्कृत-आटाटी सहसा परमार्थी नव्हे भेटी
तेचि जोडल्या मराठीसाठीं तेथ घालिती मिठी सज्ञान ॥ ३
जो जो भाषाअभिमान तो तो वक्तयासी बाधक पूर्ण
ज्या भाषां केलें ब्रह्मकथन तें होय पावन हरिचरणीं ॥ ४
महारायाच्या ताटापाशीं रिगमू नाहीं समर्थांशी
तेथें सुखेंसि बैसे माशी तेवीं हा आम्हांसी प्राकृत ग्रंथ ॥ ५
जेवीं सूर्याचेनि प्रकाशें सूर्यासीचि कीं सूर्यो दिसे
तेवीं माझेनि प्रकाशें मज मीचि असें देखत ॥ ६
ऐशियाही ठायीं जाण कैंचें नवें जुनें ज्ञान
बहुकाळ ठेविलें सुवर्ण त्यासि म्हणे कोण कुहजकु ॥ ७
काल्चाचि आजि उगवला तो सूर्य काय म्हणावा शिळा
कीं आजिचा अग्नि सोंवळा कालिचा काय वोंवळा म्हणों ये ॥ ८
तेवीं सनकादिकांचें जें ज्ञान तेंचि मराठीभाषेमाजी जाण
येथें ठेवूं जातां दूषण दोषी आपण होइजे ॥ ९
कां सुवर्णाचें केलें सुणें परी तें मोलें नव्हेचि उणें
तेवीं सनकादिकांचीं ज्ञानें देशभाषा हीनें नव्हतीच ॥ १०
जेवीं कां गुळाचें कारलें केलें परी तें कडूपणा नाहीं आलें
तेवीं हंसगीत मराठें झालें नाहीं पालटलें चिन्मात्रा ॥ ११

जें मोल मुकुटींच्या हेमासी तेंचि मोल सुवर्णश्वानासी
जो कां ग्राहिक सुवर्णासी दोघे दोघांसि समत्वें १२
डोळ्यांनीं आरिसा प्रकाशिजे तेथें डोळेनि डोळा पाहिजे
तेवीं हें ज्ञान जाणिजे देखणें देखिजे देखणेनी १३

## ५. दोघे गुरु : पर्वत आणि समुद्र

रत्नादिनिकर समस्त पर्वत परार्थचि वाहत
तृण जळ नाना अर्थ तेही परार्थ धरीतसे १
ग्रीष्माअंतीं सर्व सरे परी तो देतां मागें न सरे
सर्वांचि भगवंतें कीजे पुरें वर्षोनि जळधरें समृद्धी २
जंव जंव उल्हासे दाता देतू तंव तंव पुरवी जगन्नाथू
विकल्प न धरितां मनांतू देता अच्युतू अनिवार ३
एवं पर्वताची जे उत्पत्ति ते परोपकारार्थ एकांतीं
उपकारावांचूनि चित्तीं दुजी वृत्ति जाणेना ४
त्या पर्वताऐशी तत्त्वतां असावी साधकासी उदारता
काया वाचा आणि चित्ता सर्वस्व देतां उल्हासु ५
परमार्थाचिया चाडा स्वार्थू सांडोनि रोकडा
परोपकारार्थ अवघडा रिघे सांकडां परार्थें ६
ऊस जैसा अवधारी सर्वांसि गोडपणें उपकारी
तैसाचि योगिया संसारीं परोपकारी मधुरत्वें ७
जैसे पर्वतीं निर्झर तैसे उपकाराचे पाझर
सुकों नेणती निरंतर कृतोपकार जग केलें ८

समुद्र सदा सुप्रसन्न योगी सदा प्रसन्नवदन
केव्हांहीं घुसमुशिलेपण नव्हे जाण निजबोधें ९

मीनल्या सरितांचें समळजळ    समुद्र डहुळेना अतिनिर्मळ
तैसीं नानाकर्में करितां सकळ    सदा अविकळ योगिया    १०

जळें गंभीर सागर    योगिया स्वानुभवें गंभीर
वेला नुलंघी सागर,    नुलंघी योगीश्वर गुरुआज्ञा    ११

मळ न राहे सागरीं    लाटांसरिसा टाकी दुरी
तैसा मळ योगियाभीतरीं    ध्यानें निर्धारीं न राहे    १२

समुद्रीं मीनली ताम्रपर्णी    तेथ झाली मुक्ताफळाची खाणी
योगिया मिनली श्रद्धा येऊनी    तेथ मुक्तखाणी मुमुक्षा    १३

जो समुद्रामाजी रिघोनि राहे    तो नानापरींचीं रत्नें लाहे
योगियामाजी जो समाये    त्याचे वंदिती पाये चिद्रत्नें    १४

ग्रीष्मकाळाचिये प्राप्ती    सरितांचे यावे राहती
ते मानूनिया खंती    आपांपती वोहटेना    १५

तैसेंचि योगियाच्या ठायीं    नाना समृद्धि आलिया पाहीं
अहंता न धरी देहीं    गर्वु कांहीं चढेना    १६

संपत्तीमाजी असतां    मी संपन्नु हें नाठवे चित्ता
दरिद्र आलिया दरिद्रता    नेणें सर्वथा योगिया    १७

दरिद्र आणि संपन्नता    दोन्ही समान त्याचिया चित्ता
नाहीं प्रपंचाची आसक्तता    नारायणपर तत्वतां निजबोधें    १८

## ६. ईशस्तुति

तूं माउलीहून मायाळ चंद्राहूनी शीतळ
पाणियाहूनी पातळ कल्लोळ प्रेमाचा १
देऊं काशाची उपमा दुजी तुज पुरुषोत्तमा
ओंवाळूनी नामा तुझ्यावरूनी टाकिलों २
तुवां केलें रे अमृता गोड त्याही तूं परता
पांचां तत्त्वांचा जनिता सकळ सत्तानायक ३
कांहीं न बोलोनी आतां उगाच चरणीं ठेवितों माथा
तुका म्हणे पंढरिनाथा क्षमा करीं अपराध ४

## ७. सज्जन

(१)

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी मस्तक चरणीं ठेवीतसें १
थोरीव सांडिली आपुली परिसें नेणे सिवों कैसें लोखंडासी २
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति देह कष्टविती परउपकारें ३
भूतांची दया हें भांडवल संतां आपुली ममता नाहीं देहीं ४
तुका म्हणे सुख पराविया सुखें अमृत हें मुखें स्रवतसे ५

(२)

जे कां रंजले गांजले त्यांसि म्हणे जो आपुले १
तोचि साधु ओळखावा देव तेथेंचि जाणावा २
मृदु सबाह्य नवनीत तैसें सज्जनांचें चित्त ३
ज्यासि आपंगिता नाहीं त्यासि धरी जो हृदयीं ४

दया करणें जे पुत्रासी तेचि दासा आणि दासी ५
तुका म्हणे सांगूं किती तोचि भगवंताची मूर्ति ६

( ३ )

देवाची पूजा हे भूतांचें पाळण मत्सर तो सीण बहुतांचा १
रुसावें फुगावें आपुलियावरि उरला तो हरि सकळही २
तुका म्हणे संतपण याचि नांवें जरि होय जीव सकळांचा ३

( ४ )

सकळ चिंतामणी शरीर जरि जाय अहंकार समूळ आशा १
निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धि निर्मळ स्फटिक जैसा २
मोक्षाचें तीर्थ न लागे वाराणसी येती तयापासीं अवघीं जनें ३
तीर्थांसी तीर्थ जाला तोचि एक मोक्ष तेणें दर्शनें ४
मन शुद्ध तया काय करिसी माळा मंडित सकळां भूषणांसी ५
हरिच्या गुणें गर्जताति सदा आनंद तया मानसीं ६
तन मन धन दिलें पुरुषोत्तमा आशा नाहीं कवणाची ७
तुका म्हणे तो परिसाहूनि आगळा काय महिमा वर्णूं त्याची ८

( ५ )

गंगाजळा पाहीं पाठी पोट नाहीं अवगुण तो कांहीं अमृतासी १
रवि दीप काळिमा काय जाणे हिरा आणिकां तिमिरा नाश तेणें २
कर्पूरकांडणी काय कोंडा कणी सिंधू मेळवणी काय चाले ३
परिसचिंतामणि आणिकांच्या गुणी पालटे लागोनि नव्हे तैसा ४
तुका म्हणे तैसे जाणा संतजन सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ५

( ६ )

चंदनाचे हात पायही चंदन परिसा नाहीं हीन कोणी अंग १
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार सर्वांगीं साखर अवघी गोड २
तुका म्हणे तैसा सज्जनापासून पाहातां अवगुण मिळेचि ना ३

(७)

हिरा ठेविता ऐरणी । वांचे मारिता जो घणीं ॥ १ ॥
तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ॥ २ ॥
मोहरा तोचि अंगें । सूत न जळे ज्याचे संगें ॥ ३ ॥
तुका म्हणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ॥ ४ ॥

(८)

अर्भकाचे साठीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥ १ ॥
तैसे संत जगीं । क्रिया करुनी दाविती अंगीं ॥ २ ॥
बाळकाचे चाली । माता जाणुनि पाऊल घाली ॥ ३ ॥
तुका म्हणे नाव । जनासाठीं उदकीं ठाव ॥ ४ ॥

## ८. दुर्जन

(१)

आंधळ्यांसि जन अवघेचि आंधळे । आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥ १ ॥
रोग्यां विषतुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासि कारण चवी नाहीं ॥ २ ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण । तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

(२)

डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥ १ ॥
तरी ते नव्हती संतजन । तेथें नाहीं आत्मखुण ॥ २ ॥
मेळवूनि नरनारी । शकुन सांगे नानापरी ॥ ३ ॥
तुका म्हणे मैंद । नाहीं त्यापासीं गोविंद ॥ ४ ॥

(३)

## ९. अनुभवाचे उद्गार

(१)

बोले तैसा चाले त्याचीं वंदीन पाउलें १
अंगें झाडीन अंगण त्याचें दासत्व करीन २
त्याचा होईन किंकर उभा ठाकेन जोडोनि कर ३
तुका म्हणे चित्तीं देव त्याचे चरणीं माझा भाव ४

(२)

वृक्षवल्ली आम्हां सोयरे वनचरें पक्षीही सुस्वरें आळविती १
येणें सुखें रुचे एकांताचा वास, नाहीं गुण दोष अंगा येत २
आकाश मंडप पृथिवी आसन रमे तेथें मन क्रीडा करी ३
कंथाकुमंडलु देहउपचारा जाणवितो वारा अवसरु ४
हरिकथा भोजन परवडी विस्तार करोनि प्रकार सेवूं रुची ५
तुका म्हणे होय मनासी संवाद आपुलाचि वाद आपणांसी ६

(३)

मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास कठिण वज्रास भेदूं ऐसे १
मेले जित असों निजलियां जागे जो जो जें जें मागे तें तें देऊं २
भले तरि देऊं गांडीची लंगोटी नाठाळाचे काठी देऊं माथां ३
मायबापाहूनि बहु मायावंत करूं घातपात शत्रूहूनि ४
अमृत तें काय गोड आम्हांपुढें विष तें बापुडें कडू किती ५
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड ज्याचें पुरे कोड त्याचे परि ६

## १०. कष्टावीण फळ नाहीं

कष्टेंवीण फळ नाहीं    कष्टेंवीण राज्य नाहीं
केल्यावीण होत नाहीं    साध्य कांहीं    १

आळसें काम नासतें    हें तों प्रत्ययास येतें
कष्टाकडे चुकावितें    हीनजन    २

आधीं कष्टाचें दुःख सोसिती    ते पुढें सुखाचें फळ भोगिती
आधीं आळसें सुखावती    त्यांपुढें दुःख    ३

इहलोक अथवा परलोक    दोहींकडे सारखाचि विवेक
दीर्घसूचनेचें कौतुक    कळलें पाहिजे    ४

मेळविती तितुकें भक्षिती    ते कठिण काळीं मरोन जाती
दीर्घसूचनेनें वर्तती    तेचि भले    ५

इहलोकींचा संचितार्थ    परलोकींचा परमार्थ
संचितेंविण व्यर्थ    जीतचि मेले    ६

जेंहीं उदंड कष्ट केले    ते भाग्य भोगून ठेले
येर ते बोंलतचि राहिले    करंटे जन    ७

विचारें इहलोक परलोक    विचारें होतसे सार्थक
विचारें नित्यानित्य विवेक    पाहिला पाहिजे    ८

## ११. संभाजीस उपदेश

अखंड सावधान असावें    दुश्चित्त कदापि नसावें
तजविजा करीत बसावें    एकांत स्थळीं    १

कांहीं उग्रस्थिति सांडावी    कांहीं सौम्यता धरावी
चिंता लागावी परावी    अंतर्यामीं    २

मागील अपराध क्षमावे    कारबारी हातीं धरावे
सुखी करून सोडावे    कामाकडे    ३

पाणवठीं तुंब निघेना । तरी मग पाणी चालेना
तैसें सज्जनांच्या मना । कळलें पाहिजे ॥ ४
जनांचा प्रवाह चालला । म्हणजे कार्यभाग आटोपला
जन ठायीं ठायीं तुंबला । म्हणजे खोटें ॥ ५
श्रेष्ठीं जे जें मेळविलें । त्यासाठीं भांडत बैसलें
मग जाणावें फावलें । गलिमांसी ॥ ६
ऐसें सहसा करूं नये । दोघे भांडतां तिसऱ्यास जाये
धीर धरोन महत्कार्य । समजोन करावें ॥ ७
राजी राखतां जग । मग कार्यभागाची लगबग
ऐसें जाणोनिया सांग । समाधान राखावें ॥ ८
सकळ लोक एक करावें । गलीम निवटून काढावें
ऐसें करितां कीर्ति धांवे । दिगंतरीं ॥ ९
आधीं गाजवावे तडाखे । मग भूमंडळ धाके
ऐसें न होतां धके । राज्यास होती ॥ १०
समय प्रसंग वोळखावा । राग निपटून काढावा
आला तरी कळों नेदावा । जनांमध्यें ॥ ११
राज्यामध्यें सकळ लोक । सलगी देऊनि करावे सेवक
लोकांचे मनामध्यें धाक । उपजोंच नये ॥ १२
बहुत लोक मिळवावे । एकविचारें भरावे
कष्ट करोन घसरावें । शत्रूंवरी ॥ १३
आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मिळवावें
आपुलें राज्य करावें । जिकडे तिकडे ॥ १४
लोकीं हिंमत धरावी । शर्तीची तलवार करावी
चढती वाढती पदवी । पावावी येणें ॥ १५
सकळ सुखांचा त्याग । करूनि साधिजे तो योग
राज्यसाधनाची लगबग । कैसी असे ॥ १६

मीमाआंगीं वीरश्रीचा लोट्
धरितां न धरवे अतिउद्भट
अगस्ती धांवे समुद्र घोटूं
तैसा झगटे पुढारां. २

दोघे पिटिती पाणितळें
जानुमूळें बाहुमूळें
मही ताडितां पादतळें
शैलमौळें थरकती. ३

किरीट काढोनि हस्तकीं
केश आंवळिले मस्तकीं,
चंड गर्जना करिती मुखीं
काळ कांपे चळचळां. ४

धांवोनि भीमाची वीरगुंठी
मागधें कवळोनियां मुष्टी
दक्षिणहस्त सूदला कंठीं
काळपाशासारिखा. ५

दांत खाऊनि करकराटी
गुढघा स्थापिला हृदयपुटीं
सावध म्हणे कृष्ण जगजेठी,
'बापा ! भीमा ! बळिष्टा !' ६

भीमें भैरवाकार दृष्टी
हृदयीं वोपिली वज्रमुष्टी
सोडवूनि मगरमिठी
झिंजाडोनि लोटिला. ७

तेणें मागुती उठोनि विकळ
पडिला जैसा विशाळ ताळ
पुढती उठोनि उतावीळ
भीम मध्यें कवळिला. ८

दोन्ही कोंपर दोन्ही मुष्टी
चारी आघात वोपिले पृष्टीं
मागध क्षोभोनि उफराटी
हुमणी हाणी मस्तकीं. ९

झोंबी सोडवोनि तवकें
मस्तका मस्तकें, देती धडके,
सहस्रसंख्य लोट भडके
अशुद्धाचे चालती. १०

मस्तकें फुटोनियां धरणीं
रक्तप्रवाह भरती वदनीं.
मागध म्हणे, 'देहमरणीं
अमृतपान होतसे.' ११

हस्त वोढिती तोडावया
पाय कवळती मोडावया
डोळे टोंचिती फोडावया
पाडावया दशनांतें. १२

करप्रहार लत्ताप्रहार
मुष्टिप्रहार मस्तकप्रहार
मोजोनि मारिती शतसहस्र
'उसणें घे घे' म्हणोनी. १३

मस्तकीं वाहती करूनि मोट, भूमीं टाकिती जैसा घट,
तळीं पाषाण होती पिष्ट आंगळोटें दोघांच्या. १४

बाहु गदा बाहु मुसळें बाहु मुद्गल कर त्रिशूळें
एकमेकांचीं मर्मस्थळें पोहोनियां मारिती. १५

तळवे तळपणें चपेटे झडपा, ताडितां दोघे दाटती धापा
उडिया टाकिती सकोपा येरयेरां मस्तकीं. १६

व्याघ्राऐसे क्रोधानळीं झोंबों पाहती कंठनाळीं
सिंहाऐसे कुंभस्थळीं भेदूं म्हणती मस्तकें. १७

नीट उभारोनि बोटें हाणोनि फोडों पाहती पोटें
काढोनि अंत्रमाळ गोठें कंठीं घालूं इच्छिती. १८

वर्मस्थळीं लाविती कळे हस्तपाशीं कर्षती गळे,
दोघांचीही आतुर्बळें नाटोपती एकएका. १९

सर्पाऐसे फुस्फारिती सिंहाऐसे हुंकारती
वृषभाऐसे फुंपाटती उफाळती इसाळें. २०

मुष्टिघातांचिया ध्वनी थरथराटें थरके धरणी
वोथरोनि पाताळफणी मार्ग पाहे पळावया २१

कूर्म आंखडी हात पाय, वराह म्हणे, ' मांडिलें काय ?
दंष्ट्रास्तंभ भंगलिया, भोय कैंवि थांबे तळवटीं. ' २२

मोहो माजला विवेकासीं, क्रोध संघटे सात्त्विकासीं,
खळ वडवडी सर्वज्ञासीं तेवीं भीमासीं मागध. २३

प्रवर्तला महामारीं पतंग जैसा वैश्वानरीं
झगटे, तैसा मुष्टिप्रहारीं रागें ताडी भीमातें. २४

भीमें रगडोनियां दाढा मध्यभागीं कर्पिला गाढा
माथां वाहोनियां भवंडा चक्राकार दाविला. २५

तेथोनि टाकिला भूतळीं लात वोपिली वक्षस्थळीं
वज्रें ताडोनियां मौळी शक्र भंगी पर्वता. २६
तेवीं पडोनियां उताणा वामपादें दक्षिण चरणा
रगडोनि सव्य पाद जाणा उभयहस्तीं कवळिला. २७
आंसडोनि बळ उद्धटें मध्यें उघडिला तडतडाडें
अशुद्धनदीचे खळखळाटे रंगभूमि लोटले. २८
पडोनि मागुता उठिला झुंजा देखोनि आश्चर्य अर्जुनाग्रजा
पुढती धरोनि महाराजा दुभागिलें हस्तकें. २९
तिसऱ्यानें देहाकार घडिला, भीम हांसोनि आवेशला,
पायीं कवळोनि वहिला मस्तकावरी मागुता. ३०
शतवार देऊनियां फेरे भूमीं त्राहाटिला अंगभारें
चिरोनि सांडिला द्विकरें दोहींकडे देहुडीं. ३१
ते न लागती एक शवा मागध निःशेष मुकला जीवा
झाला भरंवसा पांडवा आणि माधवा पायींसीं. ३२
भीमसेनें आपुले हस्तीं करोनि शकलें टाकिलीं क्षितीं
जरासंधा दिधली मुक्ती कुंतीकुमरें यापरी. ३३
तेव्हां भीमें फोडिली हांक, तेणें घाबरे तिन्ही लोक,
अंगनाअंगीं भरला धाक गर्भस्राव ओसरला. ३४
म्हणती पृथ्वी दुभागिली, कीं ग्रहांचीं मंडळें खचलीं,
कीं मेरूचीं शिखरें कोसळलीं, वज्रघात न लागतां. ३५
विमानीं गंधर्व करिती शब्द, ' भीमें मारिला जरासंध,
नोहे प्रळय, हा आनंद लोकत्रयीं माजवा. ' ३६
जयजयकार करूनि सकळीं उभयलोकीं पिटिली टाळी
देवीं वोपिल्या पुष्पांजळी कृष्णभीमामस्तकीं. ३७

## १४. नल आणि हंस

रजनी दिवस गमेना, नृपतिस संगीतही सुख गमेना
मन कोठेंहि रमेना, म्हणोनि करि वनविहार सहसेना १

गंगातरंगसम जो निजदेहवर्णीं
भृंगापरी रुचिर कांति जयासि कर्णीं
जंघाल जो पवनसंगतिची सवे घे
शृंगारिला हय तयावरी भूप वेंघे २

सवें सेना भूपाळ निघालाहे
शींव लघी, उद्यान एक पाहे
रिघे तेथें, मित सेवकासि बाहे
फौज सारी बाहेर उभी राहे ३

तया वनीं एक तटाक तोयें तुडुंबलें; तामरसानपायें
निरंतरामंद मरंद वाहे तपातही यास्तव रिक्त नोहे ४

पीतां मरंद उदरंभरबंभराचें
जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें
जें पद्म तेथिल सहस्रदळा धरीतें
प्रत्येक सूर्यकिरणास विकासवीतें ५

*तया कासारीं राजहंस पाहे*
राजहंसाचा कळप पोहताहे
तयांसाठीं हे वापिकाच पोहे
नळें केली हे कोण म्हणे नोहे ? ६

तया हंसांचे देह कांचनाचे
पक्ष झळकती वीज जशी नाचे
रंग माणिकसे चंचुचे पदांचे
जसे अधरींचे भीमकन्यकेचे ७

त्यांतील एक कलहंस तटीं निजेला
तो भागला जलविहार विशेष केला
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो
पक्षीं तनू लपवि; भूप तया पहातो ८

टाकी उपानह, पदें अतिमंद ठेवी
केली विजार वरि डौरहि, मौन सेवी
हस्तीं करी वलय उंच, अशा उपायीं
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ९

कलकळ कलहंसे फार केला सुटाया
फडफड निजपक्षीं दाविलें कीं उडाया
नृपतिस *मणिबंधीं* टोंचिता होय चंचू
धरि सुदृढ जया तो काय सोडील पंचू १०

तदितर खग भेणें वेगळाले पळाले
उपवनजलकेळी जे कराया मिळाले
स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो
कठिण समय येतां कोण कामास येतो ११

न सोडी हा नळ भूमिपाळ मातें
असें जाणोनी हंस वदे त्यातें

" हंसहिंसा नच घडो तुझ्या हातें
स्वस्थळातें पावेन पक्षपातें ॥ १२

जागजागीं आहेत वीर कोटी
भले झुंजारहि शक्ति जयां मोठी
तयां माराया धैर्य धरीं पोटीं
पांखरूं हें मारणें बुद्धि खोटी ॥ १३

वधुनि माझी हे कनकरूप काया
कटकमुकुटादिक भूषणें कराया
कशी आशा उपजली तूज राया
काय नाहीं तूजला दयामाया ? ॥ १४

म्हातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया अशी
कांता काय वदों ? नवप्रसव ते सातां दिसांची तशी
पाता त्या उभयांस मी, मज विधी घातास योजीतसे
हातांमाजि नृपा तुझ्या गवसलों, आतां करावें कसें ? ॥ १५

सखे माझे, परतोनि घरा येतां
तुवां, सजणे, हा समाचार घेतां
तया शोकें घायाळ हृदय होतां
कशी होशिल तें आठवितों आतां ॥ १६

थोर होतिल बाळकें तुझीं बाळे
तुला कामा येतील वेल्हाळे
माय माझी बैसेल शोकशाळे
मला आठवितां हृदय तिचें पोळे ॥ १७

सदय हृदय याचें भूप हा तापहारी
म्हणुनि परिसतां मी होय एथें विहारी
मजहि वध कराया घातकी पातला जो
वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो? " १८

एणेंपरी परिसतां अति दीन वाचा
हेलावला नळ पयोधि दयारसाचा
सोडी, म्हणे " विहर जा अथवा फिराया
राहें यथानिजमनोरथ हंसराया " १९

सुटुनि खग पळाला, बैसला शाळशाखे
क्षणभरि निजदेहीं मुक्तिविश्रांति चाखे
स्वजन तंव तयाचे भोंवताले मिळाले
कवळिती निजबंधू, बाष्पबिंदू गळाले २०

## वामन पंडित

### १५. बालकृष्णाचा वनविहार

वनीं खेळती बाळ ते बल्लवांचे,
तुरे खोंविती मस्तकीं पल्लवांचे,
फुलांचे गळां घालिती दिव्य हार,
स्वनाथासवें ते करीती विहार. १

स्वकौशल्य ज्या गुंजमाळांत, नाना
गळां घालिती, ते करीती तनाना,
शिरीं बांधिती मोरपत्रें विचित्रें,
शरीरावरी रेखती दिव्य चित्रें. २

धांवोनि लावी पहिलें करातें,
श्रेष्ठत्व दे त्या अजि ! लेंकरातें.
जो तो म्हणे, " लाविन मीच पाणी;
धरीन आधीं प्रभु चक्रपाणी. " ३

परोपरी खेळति जी ! वनांत
अर्पूनि चित्तें जगजीवनांत
धरूनिया मर्कटपुच्छ हातीं
तयांसवें वृक्षि उडों पहाती. ४

मुखें वाहुनी लोचनभ्रूतटातें
उभारूनियां वांकुल्या मर्कटांतें,
अहो ! दाविती शब्द तैसे करीती,
असे खेळती बाळ निःशंकरीती. ५

खगांचिया साउलिच्याच संगें
ते धांवती हास्यरसप्रसंगें,

हंसाचिया. दाखविती गतीतें,
जे लाधले हंसगुरूगतीतें. ६

वनीं देखती मेघनीळास मोर
प्रमोदें करी नृत्यलीला समोर,
तपासारिखे नाचती तोक सारे,
खुणावूनि अन्योन्य कीं, " तो कसा रे ? " ७

जसे दांभिक ध्यानमुद्रा धरीती,
जना दाविती ज्ञान ही बोधरीती,
तसी दाविती ते बकाभ्यासमुद्रा
गडी हांसवीती कृपेच्या समुद्रा. ८

वदे कृष्ण गोपाळ बाळां जनातें,
" बसूनी करूं ये स्थळीं भोजनातें,
वनीं वत्स सोडा चरायासि पाणी,
तयां पाजुनी या " म्हणे चक्रपाणी. ९

" बरें कृष्णजी ! बोलसी तूं जसा रे !
तसें वर्ततों, लक्षितों तूज सारे. "
असे जेविती सोडुनी वासुरांतें,
नभीं होय आश्चर्य सर्वां सुरां तें १०

संतोषतो नंदकुमार साचा
बाळांस तैशा परमारसाचा
पंक्तीस दे लाभ अजी ! वनांत
बुद्धी जयांच्या जगजीवनांत ११

निजमुख कवणाही आड दृष्टी असेना,
रचुनि बसवि ऐसी भोंवतीं बाळसेना,

हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या,
म्हणुनि बहुत पंक्ती मंडलाकार केल्या. १२

हरी कर्णिकेच्या स्थळीं मध्यभागीं
मुलें भोंवतीं ऱ्हस्वदीर्घें विभागी,
लहानापुढें थोर अंभोजपत्रें
असीं बैसवीलीं भवार्कातपत्रें १३

असे कर्णिका अंबुजामाजि जेंवी
मुलां मध्यभागीं बसे कृष्ण जेवी
मुखीं ग्रास सप्रेम घालूनि हातीं
दहीं भात दे देव लीला पहाती. १४

वंशी नादनटी तिला कटितटीं खोवूनि पोटीं पटीं
कक्षे वामपुटीं स्वशृंगनिकटीं वेताटिही गोमटी,
जेवी नीरतटीं तरूतळवटीं, श्रीश्यामदेहीं उटी
दाटी व्योमघटीं सुरां, सुख लुटी घेती जटी धूर्जटी. १५

## १६. वेणुवादन

अंग वक्र अधरीं धरि पांवा,
गोपवेष हरि तोचि जपावा,
वामबाहुवरि गालहि ठावा,
तो ठसा स्वहृदयांत पडावा. १

मोहती व्रजपशू मृगगाई,
आमुचें नवल काय अगाई ?
स्तब्ध होती लिखितें जसि चित्रें,
वेणुच्या ध्वनिरसेंचि विचित्रें. २

ज्यांसि न स्मरण हृत्सदनांत
ग्रास वो न गिळिती वदनांत;
निद्रितेंचि अथवा लिहिलीं-हो !
चित्रिचीं न गमती पहिलीं, हो ! ३

मातृस्तनींचा रस आननांत
तों होय वेणुध्वनि काननांत,
गळे गिळेना पय वासुरांतें,
आश्चर्य वाटे गगनीं सुरांतें. ४

उचलुनि श्रवण श्रवणामृता
पशु पिती रस जीवन तो मृता,
जवळि दूरहि वृंद असा असे,
मधुवनीं हरि जेय उभा असे. ५

मल्लवेप रचिला अभिराम,
श्रीधरप्रमुसवें बलराम,
मोरपत्रमुकुटीं तरुपत्रें
नेत्र सुंदर जसीं शतपत्रें. ६

गोघनीं बहु पुढें न वजावें,
ठाव एकचि धरूनि थिजावें,
वाजवी म्हणुनि जो निज पांवा,
कृष्ण तोचि हृदयांत जपावा. ७

म्हणे एक, 'म्यां कृष्णजी देखिला रे
असा कीं ललाटीं टिळा रेखिला रे !
पहातां पहातां पहावाच वाटे,
रुते चित्त जाऊनि नेत्राच वाटे. ८

आपाद माळा प्रभु कृष्णजीची
सुधा पिती षट्पद कृष्ण जींची

प्रदक्षिणा ते अवघे तिला, हो !
करूनि गुंजारव घेति लाहो. ९

गुंजारवें भ्रमर गुंजति त्यांत देवें,
वेणुध्वनी मिसळला मृदु वासुदेवें;
आपादकंठ वनमाळ असी विराजे,
ते सेविती मधुप होउनि देवराजे. १०

वनीं राजहंसीं पिकांनीं शुकांनीं
, ध्वनी गोड तो आइकोनी सुकानीं,
त्वरें येउनि सेविलें श्रीहरीतें
महापापही नाम ज्याचें हरीतें. ११

जगज्जीवन श्रीहरी आणि काळा
करीतो जगीं जीवनाच्या सुकाळा;
असो. मेघही यानिमित्तें सखा हो,
सद्भाव ऐसा नसे आणिकां, हो ! १२

झणी उष्ण लागे सख्या केशवातें
म्हणूनि त्वरें येउनि लेश वातें;
मुकुंदावरी मेघ तो छत्र झाला,
करी स्वात्मदेहार्पण श्रीअजाला. १३

मेघध्वनी मुरलिहूनि विशेष होतो,
तेव्हां घडे महदतिक्रम कीं अहो ! तो.
शंका असी तरि उगा घन कां असेना ?
हे मंदगर्जननिमित्त असें दिसेना. १४

हळुहळू घन गर्जतसे नभीं
मुरलिहूनि चढेल म्हणोन भी;

*श्रवणभक्ति अतिक्रम वर्जतो,*
करित कीर्तनही घन गर्जतो. १५

हार शोभति गळां व्रजपाळा;
भोंवतां पशुपगोव्रजपाळा;
वेणु गोड अधरीं स्वकरीं तो
कौतुकेंच यमुनेंत करीतो. १६

असा उभा हो यमुनातटाकीं
विनोदवाणी मुरलींत टाकी,
समीर तेव्हां मलयाद्रिवासी
हळू हळू सेवित माधवासी. १७

उभें भोंवतें वृंद वृंदारकांचें
गळां हार वो ! कुंदमंदारकांचें,
असे वेष्टुनि पूजिती सर्व देव
दिसे हा स्वयें त्यांत देवाधिदेव. १८

खुरांचा धुळोरा मुखीं आणि हारीं
व्रजीं येतसे कृष्ण ऐशा विहारीं,
दिनांतीं असा धेनुवृंदांत वाटे
शशी देवकीगर्भसंभूत वाटे. १९

कुंडलें जडित दीप्ति फांकली
दाविती दिनमणीस वांकुली;
धूलिधूपितहि गंडमंडळीं
स्वप्रभा मिरवली सुकुंडलीं. २०

यदुपति दिवसांतीं येरिती पातला रे
गजपतिगति येतां गोड चित्तां गमे रे,

मुदितवदन साजे ये असा चंद्रमा, कीं
सुखकर पण ज्याला व्योमिंचा चंद्र भाकी. २१

स्वगोधनें लक्षित ये हरी तो
दु:खें दिगंतींहुनिही हरीतो;
गाई सुखी येरितिनें करीतो
देणार आम्हां सुख लौकरी तो. २२

## १७. रुक्मिणीचें स्वविवाहकथन

प्रथम म्हणे वैदर्भी, " बाई ! होत्यें ल्हान मी कन्या,
धन्या कृष्णकथा मज तेव्हांचि रुचे, न आवडे अन्या. १
भगवद्भक्त ब्राह्मण जे येती मत्पित्याचिया गेहा,
ते द्वारि हरियशोमृत पाजिति, तें मात्र चाळवी देहा. २
हरिगुणगायक सज्जन ते धनलोभी नव्हेत, परि हार,
मुद्रा कंकण घावें, न करिति माताविताहि परिहार. ३
ज्या दिवसीं हरिचरितश्रवण नसे त्यांत मज दहा दुखणीं,
दुखणी काय ? नवखणी माडी नलगे, धरा नखेंदु खणी. ४
पितृसदनीं मी वाढें जैसी, तैसीच मन्मनीं प्रीति,
रीति प्रेक्षुनि ऐसी ' दैव बळी ' म्हणति तेचि जन भीति. ५
रुक्मी माझा दादा जो आम्हां सांजणांमधें मोटा,
खोटा नव्हेचि, परि हरिचरितरसीं तो भिजे न मणिगोटा. ६
त्या स्वगुरुविचारातें निंदुनियां मोहरोगवैद्यातें,
मजला देवूं केलें दादानें हठ धरूनि चैद्यातें. ७
न चले कांहीं तेथें जननीचें, बंधुचें, स्वताताचें,
होय ल्वांत दहादां फळ इष्ट अनिष्ट आत्मघाताचें. ८
एक ब्राह्मण केवळ साधु दयामूर्ति तत्पदीं नमनें
केलीं पाय धरुनि म्यां, एकांतीं विनविला सुदीनमनें. ९
कां तो द्रवता, माझा असता जरि भाव पाहिला खोटा ?
जेणे अभयवर दिला, त्या गुरुहस्तांत म्यांहि लाखोटा. १०
स्वकरें ' वसंततिलका ' वृत्तें पत्रांत सात मोजूनी,
लिहिलीं होतीं तींही लिहितां लिहितां क्षणांत योजूनी. ११

गेला धावत घेउनि मत्पत्र द्वारकेस सद्विप्र,
या प्रणतवत्सलाला आणाया आण घालुनि क्षिप्र. १२
तों आला शाल्वमगधपतिसख तो चैद्य, माडलें लग्न,
जालें पुर तद्बलजलनिधींत, आधींत मन्मनहि मग्न. १३
ताताडि बहु दादाची, कैंचा अवकाश ? लागली हळद,
खळदर्पघ्न दिसेना, जो नतचातकदयासुधाजळद. १४
आली रात्रि, सुगात्रि ! द्रौपदि ! अवकाश तीच लग्नासि,
झाली यष्टी कृष्टी जें मन त्या आधिभारमग्नासि. १५
चिंताज्वरात रात्रौ माझा नाहींच लागला डोळा,
जायासाठीं कठीं शतवार प्राण जाहले गोळा. १६
लावियला म्या दुःखीं बाई ! त्या ईश्वरासही बोल,
यत्पदपद्मरजाचें चिंतामणिकोटिही नव्हे मोल. १७
तों प्रियकंठीं आपण पडोनि, हेही सुखात पाडावी,
या भावेंचि स्फुरली, करि माझी भुजलता कृपा डावी. १८
तोंचि समूळाधिज्वरहरमात्रा आणुनी, उषःकाळीं,
आला द्विज धन्वंतरि, सदय पिताही तसा नसे बाळीं. १९
विप्रें कथिलें मज कीं, 'वत्से ! लिहिलेस उत्तम श्लोक,
ज्याच्या अर्थश्रवणें आला धावोनि, उत्तमश्लोक.' २०
कोणालाहि न पुसता, स्वरथिं द्विज बैसवूनि सूतातें
'हू ! कुडिनमार्गी' म्हणे प्रभुवाक्य कथी 'दया प्रभूता' तें. २१
एका रात्रींतचि ये, मध्यें ते देश काय हो ! थोडे ?
जोडे त्याले पविचे, कीं बाई ! वायुमित्र ते घोडे. २२
भावोजींला कळता तेही सहसैन्य धावले, आले,
झाले एक मरुदनळ, लोकाचें काय त्यापुढें चाले ? २३

आले प्रभु, हें कळतां सामोरा शीघ्र धांवला बाप,
हा पर्जन्यप्रियसखशिखिसुख सेवी, उरेचि ना ताप २४
तातें पूजा केली, गेली चिंता विलोकितां नखरें,
प्रणतांचे तापत्रयहर, हरिपदनीररुहवितान खरें. २५
कृष्णागमनानंदें हृदयांतुनि ज्यां बळेंचि घालविलें,
चैद्यादिमनें धाया स्थळ त्या चिंतादिकांसि पाळविलें. २६
अंबेच्या नमनाला न्यावी जीचा विवाह नवरी ती,
धरि हरिशंका दादा, देवीयात्रा कुळीं न नव रीती. २७
मग बाई! दादाचे, मागधशाल्वादिकांहि मेल्यांचे
सैनिक मज रक्षाया आले, धाकें विरोनि गेल्यांचे. २८
हस्तीं शस्त्रें, दंशित, रथतुरगगजाधिरूढ ते कोले
ओले वरि वीररसें, वीरश्री कैंवि त्यांसवें बोले? २९
नमिलीं श्रीपदपद्में जीं मधुपां देति आसरा जीवां,
गंगेच्याहि नसे ती मृदुता, न श्री, न वास, राजीवां. ३०
पूजुनि पाय विनविली, 'कन्यांतें प्रसवताति ज्या माता
त्या लटिक्या, तूंचि खरी, तुज कृष्णचि योग्य होय जामाता.' ३१
ऐसें प्रार्थित होत्यें चित्तांतचि मी अशांत विप्रसती
'फलितं सर्वं' म्हणती, पूजा सांगों समीप ज्या असती. ३२
देवीप्रासादांतुनि निघतां धाया करासि आलीला
आलीला धरुनि करीं दाखविली त्या गतींत आलीला. ३३
त्या मेल्यांस कशाला पाहों मी? प्रियतमास अवलोकीं
कीं, आला कीं नाहीं; होय तडित्स्फुरण काय तेंव लोकीं? ३४
पत्रीं लिहिलें होतें 'देवीयात्रेंत मज पदें दावा,
दावा बहुतासीं हा भाव कळों दुर्जनांसि नेदावा.' ३५

प्रभुसि पहाया पूर्वीपासुनि मन्नेत्रपद्म बहु लोल,
तो लग्नसमय ते उपवासहि, लावील कोण सखि ! बोल? ३६
तों आला हरि, सुंदरि ! जोडा नाहींच त्या महा भागा
आपुलिया घ्याया, ते कोळें वारिति कसे महाभागा ? ३७
माझा मूर्त मनोरथ तो रथ आला प्रियास घेऊन,
दर्शन नयनें घेती, जैसें शिशिरीं दरिद्र घे ऊन. ३८
तों आलि म्हणे मज, ' सखि ! सुमनोमाळा वरा वहायास
हा या समयीं विधि, मग नित्य असेंचि प्रिया, पहा यास.' ३९
माळा उंचलितां, प्रिय आपणहि रथावरूनियां लवला,
लव लागेना तों घे रथिं मज, करुणासमुद्र कालवला. ४०
हंसें मुक्ता नेली, मग केला कलकलाट काकानीं,
हाकांनीं नभ भरलें, जाय सुराच्याहि नाद हा कानीं. ४१
द्रौपदि ! असी कथा हे लग्नाची; फार मी वदों काय ?
पाय प्रभुचे सतत पूजावे तरिच सफळ हा काय. " ४२

## १८. सृष्टि, तत्त्व, आणि दिव्यदृष्टि

तारा निष्प्रभ जाहल्या निजपथीं, प्राची दिशा रंगली,
गायाला खग लागले, मधुर निश्वासूं फुलें लागलीं,
प्रावारून उषा तुषारपटला सूर्यप्रतीक्षा करी;—
होतों पाहत डोंगरीवरि उभा मोहूनि मी अन्तरीं. १

' पश्यात्रास्मि ' म्हणोनि एक घुमला गंभीर तेथें ध्वनि,
' भो ! कुत्रासि ? ' विचारिलें निजमुखें तेव्हां तयालागुनी,
' कुत्राप्यस्मि च सर्ववस्तुषु ' असें ये तेधवां उत्तर;
तें ऐकूनि जरा करीत मनना मी ठाकलों नन्तर. २

धोंडा एक समीप हो पडुनियां होतां तिथें, त्यावरी
गेली दृष्टि मदीय, कौतुक तधीं झालें मनामीतरीं,
कां कीं त्या ध्वनिचें खरेपण मला धोंड्यांत त्या भासलें;
काढूं बाहिर तें झटूनि, मग हें चित्तांत मीं घेतलें. ३

टांकीचे, म्हणुनी, तयावरि जधीं आघात मीं वोपिले,
तों—सांगूं म्हणुनी किती मज मनीं आश्चर्य जें जाहलें ! —
मूर्ति दिव्य अशी अहा ! उतरली धोंड्यामधूनी मली !
माझी दृष्टि असे अलौकिक, मला जाणीव हो जाहली. ४

## १९. भृंग

भृंगा ! दंग अहा ! होसी,
गुंगत धांव वनीं घेसी;
तुजमागुनि वाटे यावें,
गोड फुलें चुम्बित गावें ! १

रवि येत असे उदयातें,
अरुणतेज विलसत दिसतें;
तरी तिमिर हें विरळ असे,
धुकें भरुनि न स्पष्ट दिसे. २

कविच्या हृदयीं उज्ज्वलता
आणिक मिळती अंधुकता;
तीच स्थिति ही भासतसे—
सृष्टी कवयित्रीच दिसे ! ३

तिच्या कल्पना या गमती
कलिका येथें ज्या फुलती
सुगंध यांतुनि जो झुकतो
रस त्यांतिल तो पाझरतो ! ४

भृंगा ! आणि तुझें गान
सृष्टीचें गमतें कवन !
गा तूं गा ! नादी भ्रमरा !
मी गणमात्रा जुळणारा ! ५

शुक पंजरबन्धी घालूं,
त्या पढवूं नरवाग् बोलूं,
श्रुतिवैचित्र्या बघणारे
आम्ही मात्रा जुळणारे ! ६

' कवि ' आम्हालागुनिया म्हणणें
कविशब्दार्था लोळवणें !
अस्मद्गान नव्हे ' गान '
तें गान चिंध्यादान ! ७

परंतु भृंगा ! तव गान
परमानंदें परिपूर्ण !
उदासीन ही जगाविशीं
तव तन्मयता सृष्टीशीं ! ८

अस्मदीय हृदयीं ठरलें
कीं जग हें दुःखें भरलें !
म्हणुनी सुंदरतेलाही
कुसें अम्हां दिसती पाहीं ! ९

परि तव गानांतुन, अले !
थबथबला हा भाव गळे :—
"गुड् गुड् गुड् गुड् !—भान नसे !
सृष्टि अहा गुड् ! मधुर असे ? १०

दुःख—वदा तें केंवि असे ?
अश्रु—तें हो काय ! कसें ?
फुलें फुलति, परिमल सुटती,
रस गळती—गुड् सौख्य किती ! " ११

जाइ, जुई, मोगरी भली,
कमलिनीहि सुंदर फुलली;
मधु यांचा सेवुनि गोड
पुरवीं तूं अपुलें कोड ! १२

प्रीति, चारुता, आनंद
यांचे गा मधुरच्छन्द;
प्रीति, चारुता, आनंद
सिंचिति सृष्टीचा कन्द ! १३

वरुनि नभातुनि चडोल
ओतितसे हेची बोल;
खालीं तव गुजारव हा
प्रतिपादितसे तेंचि अहा ! १४

होईल का रसिकता तव लब्ध मातें ?
गुंगी मिळेल मजला तव केधवा ते ?
येतें मनांत तुझियासम भृंग व्हावें,
वेलीमधूनि कलिकांवरुनी झुकावें ! १५

## २०. पुष्पाप्रत

पुष्पा ! सुंदर किती तू दिससी !
सौकुमार्य माधुर्यहि धरिसी !
तुजला बघता मन माझें तू–वेडें रे करिसी ! १

तू आणिक मी पूर्वी होतों
खेळगडी रे ! स्मरुनि अहा ! तो
काळ सुखाचा, आता चित्ता–खेद फार होतो ! २

मुग्ध मधुरता चित्तीं घेता,
पूर्वी अपुली होती समता;
गेला गेला काळ अहह तो !–फेर किती आतां ! ३

सौकुमार्य तव अजुनी आहे !
हसतचि आहे हास्य तुझें हें;
परि मम भाळीं ढग अश्रूचा–हाय ! डवरलाहे ! ४

तुजला पाहुनि मीं नाचावें,
दुडदुड धावत तुजशीं यावें,
प्रेमें तुजला स्वकरीं घेउनि–सखया चुंबावें ! ५

आतांहि गमे ध्यावें तुजला,
परी सुटतसे कंप कराला !
दिव्यत्वाला स्पर्श कराया–भय वाटे मजला ! ६
रम्य धुक्याची अद्‌भुत सृष्टि
तींत उघडिसी अपुली दृष्टि,
मग तो भास्वान् तुजवरि करितो—तेजाची वृष्टि ! ७
मरुद्‌गण तुझ्या पाळणियाला
तत्पर आंदोलन द्यायाला.
पक्षिमुखांहीं स्वर्ग तुझ्यावरि—गाई गीताला ! ८
रम्य तुझें बा जिणें कितितरि,
परिमळयश तव जाय भूवरी,
काळाहि तुझिया दिव्यत्वाला–वाटे नमन करी ! ९
चिरतरुणा रे ! चिररुचिरा रे !
तुजसन्निध तो वास बरा रे !
तुजमजमध्यें परी केवढी–आहे रुंद दरी रे ! १०
सौभाग्य पुष्पा ! तव गावयाला
मी पात्र नाहीं गमतें मनाला;
भुंगे तुझें स्तोत्र सुरेख गाती
ऐकूनि ते सर्व पळोत खंती ! ११

## २१. रांगोळी घालतांना पाहून

होतें अंगण गोमयें सकलही संमार्जिलें सुन्दर,
बालार्कें अपुली प्रभा वितरली नेत्रोत्सवा त्यावर;
तीची जी भगिनी अशी शुभमुखी दारीं अहा पातली,
रांगोळी मग त्या स्थळीं निजकरें घालावया लागली. १

आधीं ते लिहिले तिनें रविशशी, नक्षत्रमाला तदा,
मध्यें स्वस्तिक रेखिलें, मग तिनें आलेखिलें गोष्पदां,
पद्में, बिल्वदलें, फुलें, तुळसही चक्रादिकें आयुधें,
देवांचीं लिहिलीं; न तें वगळिलें जें चिन्ह लोकीं सुधें. २

होती मंजुळ गीत गात वदनीं अस्पष्ट कांहीं तरी,
गेला दाटुनि शान्त तो रस अहा तेणें मदभ्यन्तरीं;
तीर्थें, देव, सती, मुनी, नरपती, देवी तशा पावना,
अन्तर्दृष्टिपुढूनिया सरकल्या, सन्तोष झाला मना ! ३

चित्रें मीं अवलोकिलीं रुचिर जीं, काव्यें तशीं चांगलीं,
त्याहीं देखिल न स्मरेच इतुकी मद्‌वृत्ति आनन्दली;
लीलेनें स्वकरें परन्तु चतुरे! तू काढिल्या आकृती,
त्या या पाहुनि रंगली अतिशयें आहे मदीया मति. ४

रांगोळींत तुझ्या विशेष गुण जो आर्ये ! मला वाटतो,
स्पष्टत्वें इतुक्या अशक्य मिळणें काव्यांत चित्रांत तो;
स्वर्भूसंग असा तयात इतक्या अल्पावकाशीं नसे—
कोणीं दाखविला अजून, सुभगे ! जो साधिला तूं असे. ५

आदित्यादिक आकृती सुचविती दिव्यत्व तें उज्ज्वल,
तैसें स्वस्तिक सूचवी सफलता धर्मार्थकामातिल;
पावित्र्याप्रत गोष्पदें तुळसही, शोभेस हीं सारसें,
पुण्यें प्रीतिस, चक्र हें सुचवितें द्वारीं हरी या असे ! ६

तत्त्वें मंगल सर्वही विहरती स्वर्गीं तुझ्या या, अये
आर्ये ! तूं उपचारिकाच गमसी देवी तयांची स्वयें;
नातें स्नेह निदान ओळख जरी येथें मला आणिती,
होतों मी तर पाद सेवुनि तुझे रम्य स्थळीं या कृती ! ७

चित्तीं किल्मिष ज्याचिया वसतसे ऐशा जनालागुनी
यां चिन्हांतुनि हा निषेध निघतो आहे गमे मन्मनीं–
" जा मार्गे अपुल्या, न दृष्टि कर या द्वाराकडे वांकडी,
पापेच्छूवरि हें सुदर्शन पहा आणील कीं सांकडी ! " ८

" आहे निर्मल काय अंतर तुझें ? मांगल्य कीं जाणसी ?
लोकक्षोभजयें उदात्त हृदयीं व्हायास का इच्छिसी ?
ये येथें तर, या शुभाकृति मनीं घे साच अभ्यासुनी ! "
आर्ये ! स्वागत हें निघे सरल या त्वल्लेखनापासुनी. ९

साध्याहि विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे,
नित्याच्या अवलोकनें जन परी होती पहा आंधळे !
रांगोळी बघुनि इतःपर तरी होणें तयीं शाहणे,
कोठें स्वर्गसमक्षता प्रगटते हें नेहमीं पाहणें ! १०

## २२. काव्य कोणाचें ?

" कवे ! कोणीं हें काव्य लिहीयेलें ? "
" मींच—" कविनें प्रतिवचन बोलिजेलें,
" बरें तर ! हें वाचून अतां पाहूं,
श्लोक सुन्दर यांतील सदा गाऊं. " १

मनीं वाचक तों दंग फार झाला,
*क्ल्टप्ति आढळली सरस एक त्याला;*
म्हणे कविला " ही रम्य फार आहे ! "
*वदे कवि " ती मम क्ल्टप्ति परी नोहे. "* २

पुढें हृदयंगम पंक्ति एक आली,
वाचकाची तल्लीन वृत्ति झाली;

कवीला तो " शाबास ! " म्हणे, त्यातें
कवी बोले " मम पंक्ति कीं नव्हे ते. " ३

पुढें वर्णन पाहून रेखलेलें,
वाचकाचें रममाण चित्त झालें;
कविस शंसी तो " धन्य ! " अशा बोलें,
त्यास " वर्णन मम न तें " कवी बोले. ४

" काव्य लिहिलें हें सत्य तू असून,
' नव्हे माझें हें—नव्हे तें ' म्हणून
सांगसी, तर परकीय कल्पनांतें
तुवां घेउनि योजिलें, गमे मातें. " ५

" नव्हे ऐसेंही ? " कवी वदे त्यातें,
" काव्य लिहिलें मीं खरें, परी मातें
शारदेनें जो मंत्र दिला कानीं,
तसें लिहिलें मीं;—काव्य तिचें मानीं ! " ६

" दिव्य शक्तीनें स्फुरे गंध पुष्पीं,
रंग खुलतीही तिनें इन्द्रचापीं;
सृष्टिमाजी जें रम्य असे कांहीं
तीच कारण त्या शक्ति असे पाहीं. " ७

## २३. नैर्ऋत्येकडला वारा

जे जे वात-नभांत या विचरती पुण्यप्रदेशावरी
नैर्ऋत्येकडला तयांत वितरी सौख्यास या अंतरीं;
येतां तो मम चित्त हें विसरुनी प्रत्यक्ष वस्तूंप्रति,
अर्धोन्मीलित लोचनीं अनुभवी स्वप्नस्थिती मागुती ! १

तो वारा मम जन्मभूमिवरुनी येतो जवें वाहत,
हें माझ्या हृदयांत येउनि सवें मी ठाकलों चिन्तित;
माझ्या जन्मघरेचिया मग मनीं रूपास मी आणितों,
तीचे डोंगर उंच खोलहि नद्या डोळ्यांपुढें पाहतों. २
मोठे उच्च, शिळा किती पसरल्या सर्वत्र ज्यांच्यावरी,
तुंगें तीं शिखरीं यदीय शिखरें तैशीं नभाभीतरीं,
आस्वर्गात् चढती सदोदित महात्म्यांचीं जशीं मानसें,
या दृष्टीपुढते पुन्हां बघतसें अद्रीय ते हो असे ! ३
ज्यांच्या रम्य तटांवरी पसरल्या झाड्या किती सुन्दर,
ज्यांच्या थोर शिलांतुनी धवधवा जाती तसे निर्झर
वाणीचे कविदुर्दशांमधुनिया ते ओघ यावे जसे;–
या दृष्टीपुढते पुनः बघतसें अद्रीय ते हो असे ! ४
त्यांचे उंच शिरांवरी विलसती किल्ले मराठी जुने,
देवी पालक त्यांतल्या मज पुनः धिक्कारिती भाषणें !–
" कोठें पूर्वज वीर धीर तव ! तूं कोणीकडे पामरा !
ये येथें इतिहासपत्र पडकें वाचूनि पाही जरा ! " ५
जागोजाग विराजती चळजळें पाटस्थलें तीं किती,
केळी, नारळि, पोफळी, फणस ते, आंबे तिथें शोभती;
पक्षी त्यांवरुनी नितान्त करिती तें आपुलें कूजित,
स्वर्गी हें बघतां फिरूनि, मन हें होतें समुत्कण्ठित. ६
जागोजागहि दाटल्या निबिड कीं त्या राहट्या रानटी,
ते पाईरहि, खैर, किंजळ, तिथें आईनही वाढती,
वेली थोर इतस्ततः पसरुनी जातात गुंतून रे,
चेष्टा त्यांमधुनी यथेष्ट करिती नानापरी वानरें ! ७
जन्मस्थान मदीय सुन्दर असे त्या माल्यकूटांतल्या
आनन्दें वनदेवता मधुर जीं गानें भलीं गाइल्या

कवीला तो " शाबास ! " म्हणे, त्यातें
कवी बोले " मम पंक्ति कीं नव्हे ते. " ३

पुढें वर्णन पाहून रेखलेलें,
वाचकाचें रममाण चित्त झालें;
कविस शंसी तो " धन्य ! " अशा बोलें,
त्यास " वर्णन मम न तें " कवी बोले. ४

" काव्य लिहिलें हें सत्य तूं असून,
' नव्हे माझें हें—नव्हे तें ' म्हणून
सांगसी, तर परकीय कल्पनांतें
तुवां घेउनि योजिलें, गमे मातें. " ५

" नव्हे ऐसेंही ? " कवी वदे त्यातें,
" काव्य लिहिलें मीं खरें, परी मातें
शारदेनें जो मंत्र दिला कानीं,
तसें लिहिलें मीं;—काव्य तिचें मानीं ! " ६

" दिव्य शक्तीनें स्फुरे गंध पुष्पीं,
रंग खुलतीही तिनें इन्द्रचापीं;
सृष्टिमाजी जें रम्य असे कांहीं
तीच कारण त्या शक्ति असे पाहीं. " ७

## २३. नैर्ऋत्येकडला वारा

जे जे वात-नभांत या विचरती पुण्यप्रदेशावरी
नैर्ऋत्येकडला तयांत वितरी सौख्यास या अंतरीं;
येतां तो मम चित्त हें विसरुनी प्रत्यक्ष-वस्तुंप्रति,
अर्धोन्मीलित लोचनीं अनुभवी स्वप्नस्थिती मागुती ! १

भाऊ रे ! तुजलागिं लाविन कधीं मी हातभारा निज ?
वंद्यें सेवुनि मी सुखें मग कधीं घेईन का रे निज ? १४

श्वासांहीं लिहिलीं, विराम दिसती ज्यांमाजि बाष्पीय ते
प्रीतीचें वरवें समर्थन असे संस्पृश्य ज्यामाजि तें,
कान्तेचीं असलीं मला पवन हा पत्रें अतां देतसे;
डोळे झांकुनि वाचितां त्वरित तीं सम्मूढ मी होतसें ! १५

आतां प्रेमळ तीं पुनः परिसतों थोडीं तिचीं भाषणें,
चित्तीं आणुनि मी तिला अनुभवीं गोडीं तिचीं चुम्बनें !
ओठां हालवितां न मी वदतसें मार्गील संवाद तो,
मी काल क्रमुनी असा, जड जगा काडीवजा लेखितों ! १६

नाहीं चैन तुला मुळीं पडत ना माझ्याविना मत्प्रिये ?
तूंतें आठविल्याविना दिवसही माझा न जाई सये !
केव्हां येतिल तीं दिनें न करण्या ताटातुटी आपुली ?
केव्हां त्या रजनी ? – जियांत विसरूं मीतूंपणाला मुळीं ! १७

माझ्या जन्मधरेपुढें दिसतसे वारांशि विस्तीर्ण तो,
त्याचें रम्य तरंगताण्डव पुनः पाहूनि आल्हादतों,
जें हृद्रम्य तरंगताण्डव मला तैशापरी वाटतें,
अज्ञेयावरतीं जसें क्षणिक हें अस्तित्व हो खेळतें ! १८

मज्जन्मावसरास, तीं पवन हा वेगें पहा तेथुनी
मातें पोंचवितो, तयां अपुलिया पंखावरी वाहुनी ! ८

" गाऊं या ! हृदयांत या अमुचिया प्रीती असे दाटली !
गाऊं या ! हृदयांत या अमुचिया कां स्फूर्ति ही वाढली ?
वाग्देवीसुत जन्मला अपुलिया ग्रामांत; यालागुनी
जैजैकार करा, सुरा परिसवा हा मंगलाचा ध्वनी ! " ९

वेगानें जगदुद्धरानदिचिया तीराहुनी वात तो
आशीर्वाद मदीय तातजननी यांचे मला आणितो;
वात्सल्यास तयाचिया परिसुनी माझ्या मनीं येतसें—
' तान्हा बाळचि राहतों तर किती तें गोड होतें असें ! ' १०

आईच्या नयनात नित्य मग मी स्वर्गास त्या पाहतों,
तातांकावरि नित्य मी मग जगद्राज्यासना भावितों,
कां हो यापरि वाढलों फुकट मी ! हा-हत ! मी नष्ट हा !
तान्हा बाळचि राहतों तर किती तें गोड होतें अहा ! ११

जन्मा येउनि मीं उगा शिणविलें आई ! तुला हाय गे !
ताता भागविलें तुला फुकट मीं मत्पोषणीं हाय रे !
वार्धक्यीं सुख राहिलें, विसरणें तुम्हास कोणीकडे !
झालों कष्टद मात्र—या मम शिरीं का वीज ती ना पडे ? १२

पुष्पें वेंचित आणि गोड सुफळें चाखीत बागांतुनी
जेथें हिंडत शैशवीं विहरलों निश्चिन्त मी, तेथुनी—
*हा वारा, ममताप्रसाद मजला आजोळचा आणितो;*
चित्तीं विह्वल होतसें स्मरुनि, मी मातामहा वन्दितों ! १३

बन्धूचींहि मला तशीं पवन हा आशीर्वचें आणितो,
चिन्ताग्रस्त तदीय पाहुनि मुखा अश्रूंस मी गाळितों !

भाऊ रे ! तुजलागिं लाविन कधीं मी हातभारा निज ?
तूंतें सेवुनि मी सुखें मग कधीं घेईन का रे निज ? १४

श्वासांहीं लिहिलीं, विराम दिसती ज्यांमाजि बाष्पीय ते
प्रीतीचें बरवें समर्थन असें संस्पृह्य ज्यामाजि तें,
कान्तेचीं असलीं मला पवन हा पत्रें अतां देतसे;
डोळे झांकुनि वाचितां त्वरित तीं सम्मूढ मी होतसें ! १५

आतां प्रेमळ तीं पुन: परिसतों थोडीं तिचीं भाषणें,
चित्तीं आणुनि मी तिला अनुभवीं गोडीं तिचीं चुम्बनें !
ओठां हालवितां न मी वदतसें मार्गील संवाद तो,
मी काल क्रमुनी असा,'जड जगा काडीवजा लेखितों ! १६

नाहीं चैन तुला मुळीं पडत ना माझ्याविना' मत्प्रिये ?
तूंतें आठविल्याविना दिवसही माझा न जाई सये !
केव्हां येतिल तीं दिनें न करण्या ताटातुटी आपुली ?
केव्हां त्या रजनी ?– जियांत विसरूं मीतूंपणाला मुळीं ! १७

माझ्या जन्मधरेपुढें दिसतसे वारांशि विस्तीर्ण तो,
त्याचें रम्य तरंगताण्डव पुन: पाहूनि आल्हादतों,
जें हृद्रम्य तरंगताण्डव मला तैसापरी वाटतें,
अज्ञेयावरतीं जसें क्षणिक हें अस्तित्व हो खेळतें ! १८

या अब्धीवरुनि जात असतां वाल्यात नौकेंतुनि,
गाणीं, जीं म्हटलीं मला निजविण्या वारिस्थ देवीगणीं,
त्यांचे सूर अतां अलौकिक असे जे वात हा आणितो–
ते ऐकून अहा ! सुषुप्ति चिर ती घ्यायास मी इच्छितों ! १९

प्रीती या जगतांत कंटकयुता ही एक वल्ली असे,
शूलारोपणयूप त्यावरिल ही कीर्तिध्वजा कीं दिसे;

तेव्हा या जगतीं नकोत मजला ते भोग भोगायला,
वाटे नाटक शोकसंकुल असें जीवित्व हें याजला ! २०
देवी सागरिका ! तुम्हीं तर अता तीं गायनें गाइजे,
त्याच्या धुद अफूगुणें किरकिऱ्या वाळास या आणिजे
निद्रा दीर्घ–जिच्यामधीं न कसलीं स्वप्नें कधीं येतिल,
ती निद्रा निजता न मन्नयन हे ओले मुळीं होतिल । २१

## २४. भयचकित नमावें तुज रमणी !

भयचकित नमावें तुज रमणी,
*जन कसे तुडविती तुज चरणीं ?* ध्रु०

महाकवी, तत्त्वज्ञ, भूपती,
समरधुरंधर वीर धीरगति,
स्थितप्रज्ञ हरि उरीं कोंडिती,
प्रसव तयांचा तूं जननी. १

भूत निघाला तव उदरांतुन
वर्तमान घे अंकीं लोळण,
भविष्य पाही मुली, रात्रंदिन
तव हाकेची वाट मनीं. २

तुझ्या कांतिनें चंद्र झळझळे;
फुला फूलपण मुली, तुजमुळें;
रत्नी राग तुझा गे उजळे;
तुझ्यास्तवच ही प्रिय भगिनी ! ३

## २५. घन तमीं शुक्र बघ राज्य करी !

घन तमीं शुक्र बघ राज्य करी,
रे खिन्न मना, बघ जरा तरी ! ध्रु०

ये बाहेरी अंडें फोडुनि
शुद्ध मोकळ्या वातावरणीं,
कां गुदमरशी आंतच कुढुनी ?
रे ! मार भरारी जरा वरी. १

प्रसवे अवस सुवर्णा अरुणा,
उषा प्रसवते अनंत किरणां,
पहा कशी ही वाहे करुणा
कां बागुल तूं रचितोस घरीं ? २

फूल हसे कांट्यांत बघ कसें,
काळ्या ढगिं बघ तेज रसरसे,
तींव्र हिमांतुनि वसंतहि हसे,
रे, उघड नयन, कळ पळे दुरी. ३

फूल गळे, फळ गोड जाहलें,
बीज नुरे, डौलांत तरु डुले;
तेल जळे, बघ ज्योत पाजळे;
का मरणिं अमरता ही न खरी ? ४

मना, वृथा कां भीशी मरणा ?
दार सुखाचें तें हरि–करुणा !
आई पाही वाट रे मना,
पसरोनि बाहु कवळण्या उरीं.

## २६. मरणांत खरोखर जग जगतें !

मरणांत खरोखर जग जगतें;
अधिं मरण, अमरपण ये मग तें. ध्रु०

अनंत मरणें अधीं मरावीं,
स्वातंत्र्याची आस धरावी,
मारिल मरणाचि मरणा भावी,
मग चिरंजीवपण ये बघ तें. १

सर्वस्वाचें दान अर्धी करि
सर्वस्वच ये स्वयें तुझ्या घरिं,
सर्वस्वाचा यज्ञ करीं तरि,
रे ! स्वयें सैल बंधन पडतें. २

स्वातंत्र्याचा एकचि ठावा
केवळ यज्ञचि मजला ठावा;
यज्ञ मार्ग ! हो यज्ञ विसावा !
का यज्ञाविण कांहीं मिळतें ? ३

सीता सति यज्ञीं दे निज बळि,
उजळुनि ये सोन्याची पुतळी,
बळी देऊनि बळी हो बळी,
यज्ञेंच पुढें पाऊल पडतें. ४

यज्ञिं अहर्निश रवि धगधगतो,
स्वसत्त्वदानें पाश छेदितो,
ज्योतिर्गण नव जन्मुनि जगतो,
रे स्वभाव हा ! उलटें भलतें. ५

प्रकृति-गती ही मनिं उमजुनिया
उठा वीर, कार्पण्य त्यजुनिया;
' जय हर ! ' गर्जा मातेस्तव या !
बडबडुनी कांहीं का मिळतें ? ६

## २७. झांशीवाली

रे हिंदबांधवा, थांब या स्थळीं अश्रु दोन ढाळीं,
ती पराक्रमाची ज्योत मावळे इथें झांशिवाली. ध्रु०

ताम्बेकुलवीरश्री ती
नेवाळकराची कीर्ती,
हिंदभूध्वजा जणु जळती,
मर्दानी राणी लक्ष्मीबाई मूर्त महाकाली ! १

घोड्यावर खद्या स्वार,
हातात नंगि तर्वार,
खणखणा करित ती वार
गोऱ्यांची कोंडी फोडित पाडित वीर इथें आली. २

कडकडा कडाडे बिजली,
शत्रुंचीं लष्करें थिजलीं,
मग कीर्तिरूप ती उरली,
ती हिंदभूमिच्या पराक्रमाची इतिश्रीच झाली ! ३

मिळतील इथें शाहीर,
लववितील माना वीर,
तरु, झरे ढाळितिल नीर,
ह्या दगडां फुटतील जिभा कथाया कथा सकळ काळीं ! ४

## २८. एक आकांक्षा

हलु हलु हलु वर वर नभिं मेघशकल चाले,
नील जळीं नाव काय मूक शांत हाले ? ०

अरुण, जांभळी, सुनेरि
लखलख करि कड रुपेरि,
सायतनें हें पाहुनि नयन भरुनि आले ! १

काय रम्य हें विमान
ज्यांत वसुनि पुण्यवान
वरि वरि वरि अपुल्या घरिं जावया निघाले ! २

पुण्यात्में भवयात्रा
साधुनि तर्पुनि गात्रां
गांठति घर पाहुनि वर व्याकुळ मन झालें. ३
काय कर्धी मजसमान
पुरुषास्तव ये विमान
हें वाटुनि उर दाटुनि हृदय भारि झालें ! ४

## २९. मावळत्या सूर्याप्रत

मावळत्या दिनकरा, अर्घ्य तुज जोडुनि दोन्ही करा ! ध्रु०
जो तो वंदन करी उगवत्या,
जो तो पाठ फिरवि मावळत्या,
रीत जगाची ही रे सवित्या !
स्वार्थपरायणपरा. १
उपकाराची कुणा आठवण ?
' शितें तोंवरी भुतें ' अशी म्हण;
' जगात भरलें तोंडपुजेपण '
धरी पाठिवर शरा ! २
असक्त परि तू केलिस वणवण,
दिलेस जीवन, हे नारायण,
मनीं न धरिलें सानथोरपण.
समदर्शी तू खरा ! ३
प्रभु-सचिवा विरहीं मुखधूसर
होति दयामृदु नयनिष्ठुर कर
टाकुनि कारभार चंद्रावर
चाल्लास तूं घरा ! ४

## ३०. एखाद्याचें नशीब

काहीं गोड फुलें सदा विहरतीं स्वर्गांगनांच्या शिरीं,
कांहीं ठेवितसे कुणी रसिकही स्वच्छंद हृन्मंदिरीं;
काहीं जाउनि बैसती प्रभुपदीं पापापदावारि तें,
एखादें फुटकें नशीब—म्हणुनी प्रेतास शृंगारितें ! १

कोणी पर्वत आपुल्या शिरिं धरी हेमप्रभाशीतला,
कोणाच्या उदरामधून निघती मोठ्या नद्या निर्मला;
कोणाला वनदेवता वरितसे मोदात जी नाहते,
एखाद्यामधुनी परंतु जळती ज्वालानदी वाहते ! २

झाडें जोडुनि पत्रयुग्म फुटलें मेघाप्रती याचतीं,
स्वच्छंदें जलबिंदु तोंच सगळ्या पानावरी नाचती;
सारीं पालवतीं, फुलें विहरतीं, शोभा वरी लोळते,
एखाद्यावर मात्र वीज पडुनी त्या जाळते पोळते ! ३

चाले खेळ असा जगांत; बहुधा सौख्यात सारे जरी,
एखादा पडतो तसाच चुकुनी दुःखार्णवीं यापरी;
पाही कोण अशा हताशहृदया ? जो तो असे आपला,
देवा ! तू तरि टाकि अश्रु वरुनी, त्यासाठिं तो तापला ! ४

## ३१. विरामचिन्हें

जेव्हां जीवनलेखनास जगतीं प्रारंभ मीं मांडिला,
जो जो दृष्टिंत ये पदार्थ सहजीं वाटे हवासा मला !
बाल्याची पहिली अशी बदलली दृष्टी सदा वागडे,
तेव्हा ' स्वल्पविराम ' मात्र दिसती स्वच्छंद चोहींकडे ! १

आहे काय जगांत ? काय तिकडे ? हें कोण ? कोठें असे ?
सांगा ईश्वर कोण ? त्या पलिकडे तें काय ? केव्हां ? कसें ?
जें तें पाहुनि यापरी भकतसे; दक्‌संशयें टाकित,
सारा जीवनलेख मी करितसें तैं ' प्रश्नचिन्हां'कित !     २

अर्धांगी पुढती करी वश मना, शृंगारदेवी नटे,
अर्धें जीवन सार्थ होइल इथें साक्षी मनाची पटे;
प्रेमानें मग एकजीव बनतां भूमीवरी स्वर्ग ये !
केला ' अर्धविराम ' तेथ; गमलें येथून हालूं नये !     ३

झाली व्यापक दृष्टि; चित्त फिरलें साश्चर्य विश्वांतरीं
दिक्कालादि अनंतरूप बघतां मी होत वेड्यापरी !
सूक्ष्मस्थूलहि सारखी भ्रमविती; लागे मुळीं अंत न,
त्या काळीं मग जाहलें सहजची ' उद्‌गार'वाची मन !     ४

आशा, प्रेम, नवीन वैभव, तशी कीर्तिप्रमा, सयश,
हीं एकेक समर्थ आज नसतीं चित्ता कराया वश !
सर्वांचा परमोच्च संगम चिरं जेथें असे जाहला,
देवा ! ' पूर्णविराम ' त्या तव पदीं दे शीघ्र आतां मला !     ५

## ३२. पुनर्विकसन

दयाघना ! विनति करित मन तुज हें चिरविरहें तापतां !
धन्य विश्वरचना ही । यथासांग सर्व कांहिं
न्यून जींत मुळिं नाहीं । मत्सरेंहि पाहतां !     १

वस्तुवस्तुमात्राला । नाशकाल जरि दिधला,
तरि फिरुनी उदयाला । काल असे तत्त्वतां !     २

अस्तंगत सूर्याला । सुप्रभात उदयाला,
शुक्लपक्षिं चंद्राला । फिरुनि वरी पूर्णता !     ३

वर्षाऋतु समयाला । प्रतिवर्षी ये चपला,
प्रतिवसंत वृक्षाला । जन्म नवा आणिता ! ४

भरतीचा नियतकाल । जलधीचे हरित हाल
रात्रीं नक्षत्रजाल । वरि नवी अपूर्वता ! ५

पाहुनि हें नवविकसन । सुप्रसन्न होई मन,
परि विचारि दीनवदन । बालक हा नेणता ! ६

या मदीय चिरनिराश । जीव-मृत मानसास
पुनरपि उमलावयास । काल दिला कोणता ? ७

## ३३. परमाणूंचें कार्यमाहात्म्य

गिरिशिखरें खरताना त्यातुनि कण वाळूचे पडतात,
महासागरोदरीं तेथुनी विश्रातीस्तव दडतात; १

कालमापनास्तव जन त्याना घटिकायत्रीं भरतात,
क्षणाक्षणासह एक एक ते खालीं भरभर झरतात; २

गिरिस्वरूपा उन्नतिच्या ते करिती देहाची घटना,
विस्तारास्तव शय्यारचना मग करणें लागे त्याना; ३

झटाति अनंतर अनंताचीही शोधायास्तव परिमाणा,
कालस्वरूप कालाचीही मोजिति घटका भरताना; ४

निजकवनाचें मसिलेखन हें, पुसुनि न जावें क्षुद्र तरी;
' गोविंदाग्रज ' यास्तव त्यावरि वाळूचे कण हे पसरी. ५

## ३४. तडाग असतों तर —

विमल चंद्रिका क्षितिजावरतीं,
तरल तारका चमचम करिती,
दिव्य लोकिंची रुचिरा शांती,
तुडुंब भरली गगनांत; १

ग्रहाग्रहावर भरलें तेज,
तेजाची लयलूटच आज,
रात्रीचा शेवटला साज
देव करिती जणुं स्वर्गांत. २

तेज दाटलें, शांति दाटली,
सौंदर्याची वेलहि फुलली;
प्रेमाच्या नव पुष्पीं नटली
कविच्या हृदयांत. ३

मंद तेज अवनीवरते तें
मधु एकांता वादवितें तें,
त्यांतहि वारा हळूच हाले.
निर्भर रुचिरानंदांत. ४

या समयीं जर तडाग असतों;
रम्य दिव्य तें रेखित बसतों;
हीच शांतता अशीच धरितो.
शुभ्र जलाच्या हृदयांत. ५

सौंदर्यानें जीवन बाणे,
प्रेमजागृती हो मग त्यानें,
व्हरीवर हें लिहुनी गाणें,
दिवसा बसतों मग गात. ६

चित्रकराला कविरायाला,
अशक्य जें कां उठवायाला,
सौंदर्याच्या नव नव लीला,
त्या उठल्या मम हृदयांत. ७

## ३५. पारवा

भिंत, खचली, कलथून खांब गेला,
जुनी पडकी उद्ध्वस्त धर्मशाळा;
तिच्या कौलारीं बसुनि पारवा तो
खिन्न नीरस एकांतगीत गातो. १

सूर्य मध्यान्हीं नभीं उभा राहे,
घार मंडळ त्याभंवतिं घालिताहे,
पक्षि पानांच्या शांत सावल्यांत
सुखें साखरझोंपेंत पेंगतात. २

तुला नाहीं परि हौस उडायाची,
गोड हिरव्या झुबक्यांत दडायाची,
उष्ण झळया बाहेर तापतात.
गीतनिद्रा तव आंत अखंडीत. ३

चित्त किंवा तव कोंवळ्या विखारें
दुखतखुपतें का सांग, सांग वा रे!
तुला कांहीं जगतांत नको मान ?
गोड गावें मग भान हें कुठून ? ४

झोंप सौख्यानंदांत मानवाची
पुरी क्षणही कोठून टिकायाची ?
फिरे माझ्या जगतांत उष्ण वारें
भान त्याचें कोठून तुला बा रे ? ५

## २६. औदुंबर

ऐल: तटावर पैल तटावर हिरवाळी घेउन
निळासांवळा झरा वाहतो बेटाबेटांतुन. १
चार घरांचें गांव चिमुकलें पैल टेकडीकडे;
शेतमळ्यांची दाट लागली हिरवी गरदी पुढें. २
पायवाट पांढरी तयांतुनि अडवीतिडवी पडे;
हिरव्या-कुरणांमधुन चालली काळ्या डोहाकडे. ३
झांकळुनी जळ गोड काळिमा पसरी लाटांवर;
पाय टाकुनी जळांत बसला असला औदुंबर. ४

## २७. गवताचें गाणें

परस्परांकंठीं हात — घालुनिया बसलों गात
ऐको ना ऐको कोणी — हीं अमुचीं वेडीं गाणीं
उच्छृंखल ओढा चाले, — उच्छृंखल मारुत डोले,
उच्छृंखल अभ्रें झालीं, — उच्छृंखल अमुची बोली.
अर्थ तयाचा कुणा जरी — कळे न, परवा काय तरी ?
ज्ञान असो अज्ञान हे — गोड अम्हां अमुचें आहे १

* * *

स्वर्गातुनि आली आई, मजुरवें आम्हा वाही.
ती वदली "लाला लाला या या रे नाचायाला."
वारा, पाउस, ऊन गडे नाचनाचती स्वैर पुढ
पख पाचुचे तुम्हाहि ते याँ उडवित येथें तेथें
या जननीवचनीं धालों, नाचत वर आलों आलों २

* * *

पवनाच्या आदोलात . देवदूत होते गात.
आलिंगुनि आम्हाला ते हालविती गद्‌गद होतें.
परस्परा चुंबित जावें, नाचावें, मजुळ गावें;
झोंक्यावर झोंके घ्यावे, सृष्टीशीं समरस व्हावें. ३

* * *

उच कड्यावरती कोणी प्रेमाचीं वसवी ठाणीं.
खोल दरी अधारात तेथेंही कोणी झुलत,
एक परी अमुचें गीत. सर्वांचें एकच चित्त.
द्वैताला ठावच नाहीं, प्रेम दिसे ज्या त्या ठायीं,
प्रेम बनुन जीवेंभावें प्रेमाला शोधित जावें ४

## ३८. अज्ञात नाथास

आहेस तूं जगीं हें खोटें खरें न ठावें,
नाथा, तथापि तूंतें मी वाहतें स्वभावें.
येशील का कुठूनी केव्हां कसा कळेना,
मी जागच्याच जागीं शोधीत तूज धावें.
स्वर्गांतुनी मनाच्या घे झोंत भावगङ्गा,
अन् ही सदाशिवाच्या शीर्षीच शान्ति पावे.
जाऊनि दूर राया, लोपे मनीं न माया,
कापायवेप का या हृत्सङ्गिनीस भावे ?
भाण्डार लुटवाया केले प्रयास वाया,
सौभाग्य अन्तरींचें वाढे तुझ्या प्रभावें !
प्रीतीच ज्योत ज्याची तो दीप जन्म माझा,
गाभारियांत तुझ्या नन्दादियें जळावें.
काळीज धुगधुगे तों कर्तव्य हें टळेना,
अन् गात गात न्हावें हेंही तुझ्याच नांवें.
जात्याच दुर्बळा मी, मग्दूर काय माझा ?
स्वामी, धरूनि हातीं वेडीस चालवावें.
कोठें घरीं, वनीं वा दर्यावरी, रणीं वा,
सामीप्य गाढ तूझें चित्तीं सदा पटावें.
येवो अथाङ्ग पाणी, वारा असो तुफानी,
जावो पुढेंच तारूं, बैसोत हेलकावे !
कान्ती तुझ्या स्मिताची सञ्जीवनीच माझी,
रे, मृत्युभीति चित्तीं प्रीतीसवें न मावे.

## ३९ साशीर्वाद निरोप

'ताता' ! मारित हाक लाडिक अशी धावूनि आलास तूं,
होतो वाचित मी चिडूनि म्हटलें 'जा ! देशि का त्रास तूं ?'
झालें खर्कन तोंड वाइट तुझें, तत्काळ येई रडें,
अन् वेगें फिरलास तूं परतुनी जायास कोणीकडे—
तों पाठीवरती कडाडुनी बसे चाबूक तैशापरी
मी खुर्चीवरुनी त्वरेंच उठलों दुक्खावुनी अन्तरीं,
घेई मी उचलूनि अङ्ग तव तों थोडें दिसे तापलें,
जीवा चैन नसे तुझ्या म्हणुनि ना आलास 'ताताकडे ?'....

आतां तूं असशी सुखी, विसरुनी गेलास तें मागलें,
मी मोठा, मजला न तें विसरवें, जीवास तें लागलें;
घ्यावी धाव तुवा अशी मजकडे अन् मीं करावें दुरी ?
—बाळा जाऊं नको दुरी भरभरे रे प्रेम माझे उरीं !
जातां ध्यात करावया पण पुढें तूं जा दुरी खन्त न.
साशीर्वाद निरोप घे, करिन मी तूझें यशश्चिन्तन.

## ४०. रामद्वारीं

काशीहुनी मी अयोध्येस जाई
श्रीरामाच्या मन्दिरीं ध्यान पाहीं,
पाहीं तेथें मी महाराष्ट्रीयास,
आनन्दानें चित्त पावे विकास.
पृच्छा केली मीं मराठींत त्याला
वृद्धाचा त्या जीव उत्फुल्ल झाला,
वाटे कोणी लाभला आप्तमित्र
त्या भेटीची माधुरी ती विचित्र.

होता पूर्वी काय गोदातटींचे ?
सेवेसाठीं येथ आला कधींचे ?
वर्षे गेलीं कानपूरांत कांहीं
अन् वार्धक्यीं राहतो रामपायीं ?
पोरेंबाळें तीं कुठें ? कोण कोण ?
साझा पत्ते ठेवितो मी टिपोन,
यात्रेमाजी भेट त्यांचीहि घेतों—
त्याची चर्या पालटे जों वदे तोः—
'माता रामो मत्पिता रामचन्द्रः
स्वामी रामो मत्सखा रामचन्द्रः
सर्वस्वं मे रामचन्द्रो दयालु—
र्नान्यं जाने नैव जाने न जाने '
होती मातें पाठ ती रामरक्षा,
चित्तीं आतां बाणली ती विवक्षा;
दोघांचीहि सम्पली येथ भाषा
लागे रामीं दृष्टि तेथेंच आशा.

## चरित्रविषयक, अर्थनिर्णायक व अवांतर टीपा

[ सूचना : ओळीचा क्रमांक पृष्ठावरील नसून त्या त्या कवितेतील आहे. ]

**१ ज्ञानेश्वर ( इ. स. १२७५–१२९६ ):**

ज्ञानेश्वर मराठीचे सर्वश्रेष्ठ संतकवि होत. ते पैठणजवळील अपेगांवचे राहणारे. त्यांच्या वडिलांचें नांव विठ्ठलपंत आणि आईचें नांव रखुमाबाई. या दंपतीस निवृत्तिनाथ, ज्ञानदेव व सोपानदेव हे तीन पुत्र आणि मुक्ताबाई ही एक कन्या होती. ' निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई । एकनाथ, नामदेव, तुकाराम ' या सर्वश्रुत वारकरी भजनांत अगदीं आरंभीं याच चौघां भावंडांचीं नांवें आहेत. त्यावरून त्यांची थोरवी लक्षांत येईल.

ज्ञानेश्वरांनीं श्रीमद्‌भगवद्‌गीतेवर भावार्थदीपिका ही ओवीबद्ध मराठी टीका लिहिली आहे. ती लिहितांना त्यांचें वय अवघें पंधरा वर्षांचें होतें. यावरून त्यांच्या ईश्वरदत्त प्रतिभेची सहज कल्पना येईल. याच टीकेला सर्वसाधारण जन ज्ञानेश्वरी या नांवानें ओळखतात. मूळ गीतेंतील तत्त्वांचें मराठींत स्पष्टीकरण करतांना ज्ञानेश्वरांनीं उपमा, उत्प्रेक्षा, रूपकें, दृष्टान्त इत्यादि अलंकारांचा एकसारखा वर्षाव केला आहे. त्यामुळें तत्त्वज्ञानाला काव्याची जोड मिळून मूळ संस्कृत ग्रंथापेक्षां मराठी टीका विशेषच सरस-रमणीय झाली आहे. ज्ञानेश्वरांनीं अलंकारांत ज्या प्रसंगांची योजना केली आहे, ते वाचकांच्या नित्याच्या अवलोकनांतले आणि परिचयाचे असल्या-मुळें त्यांची टीका अतिशय हृदयंगम झाली आहे.

या टीकेशिवाय अनुभवामृत आणि चांगदेवपासष्टी हे दोन ओवीबद्ध ग्रंथ व हरिपाठाचे अभंग ज्ञानेश्वरांच्या नांवावर मोडतात. ओवीबद्ध ग्रंथांत ज्ञानेश्वरांचें विद्वत्त्व प्रकट झालें आहे तर अभंगांत त्यांच्या अंतःकरणांतील भावाविष्कार उतरला आहे. अभंगांत विठ्ठलभक्तीचें माहात्म्य विशेष आहे. ज्ञानेश्वरींत विठ्ठलाचा उल्लेखहि नाहीं. त्यामुळें कांहीं संशोधक अशी शंका घेतात कीं, ओवीबद्ध ग्रंथ लिहिणारे ज्ञानेश्वर आणि अभंग रचणारे ज्ञानेश्वर या दोन भिन्न व्यक्ति असाव्यात. परंतु महाराष्ट्रांतला वारकरी पंथ मात्र ज्ञानेश्वर एकच होते असें मानतो.

**१ रसिकांस—**

हा उतारा ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायाच्या प्रारंभीं प्रास्ताविक म्हणून आहे. तो सर्वस्वी स्वतंत्र आहे. त्यावरून ज्ञानेश्वरांच्या नैसर्गिक काव्यशक्तीची

पृ. १ ओ. १५ व १६ यांत अवास्तव सलगी झाली खरी. परंतु ते सर्वश्रेष्ठ उदारहृदय आहेत म्हणूनच मीं त्यांच्या चरणांना लागून ही विनंती केली आहे.

... ... १८ आथी—( ' अस्ति ' असून ) असतो.

... ... १९ तैसा...सज्जनीं—तुम्हा सज्जनांकडून माझा स्वीकार केला गेला आहे.

... ... २० तर माझें उणें सहज सहन करा अशी प्रार्थना कशास करूं!

... ... २१ आणीक—दुसरा; अन्य.
गीतार्थु.. पाहें—( संस्कृत ) गीतेचा अर्थ ( सामान्य मराठींत ) आणूं पाहात आहें.

... ... २२ ते अवधारा....म्हणौनियां—म्हणूनच तें ( भाषांतर ) सावध ऐका अशी विनंती आहे.

पृ. २ ओ. २३ हें म्ह० ( गीतेचें मराठीकरण )
अनावर—आवरण्यास कठीण; माझ्या आंवाक्याबाहेरचें.
वायांचि धिंवसा—भलताच धीटपणा.
उपनला—उत्पन्न झाला.

... ... २४ नाहीं तर सूर्याच्या प्रकाशापुढें काजव्याची शोभा ती काय! मूळ संस्कृतार्थ हा सूर्यासारखा तर मराठी अर्थ हा काजव्यासारखा असा आशय. खद्योत—काजवा.

... ... २५ व २६ ( विशाल ) समुद्रांत ( चिमुकली ) टिटवी आपल्या (इवल्याशा) चोचीचें माप शिरवून बघते. तसेंच माझ्या-सारख्या अज्ञ मनुष्यानें या कार्यास प्रवृत्त होणें आहे.

... ... २७ व २८ ऐका, आकाशाला कवळावयाचें असेल तर कवळ-णारानें त्यापेक्षां मोठें झालें पाहिजे.
अपाड हें—हें ( कार्य ) आटोक्याबाहेरील आहे.
निर्धारितां—विचार केला तर.

... ... २९ हें—म्ह० गीतेंतील तत्त्वज्ञान. अपार—निर्मर्याद.
कैसेनि कवळावें-( मराठींत ) कसें आणावें.
घवळावें—दवळावें, घुसळावें.

कल्पना येईल. गुरु निवृत्तिनाथ आणि श्रोतृवृंदातील संत समक्ष बसले आहेत. ज्ञानेश्वर त्याना आपली टीका समजावून सागत आहेत. ते माना डोलवून ज्ञानेश्वराना उत्तेजन देत आहेत. असा प्रसग डोळ्यापुढें कल्पून हा उतारा अभ्यासावा. यात ज्ञानेश्वराचें प्रेमळ आणि नम्र व्यक्तिमत्त्व प्रतिबिंबित झालें आहे.

ज्ञानेश्वरांच्या लेखनशैलींत विषयप्रतिपादनाची प्रसन्नता, अर्थांची स्पष्टता, अलकाराची योजकता व त्यात प्रकट झालेली त्याच्या प्रज्ञेची सूक्ष्मता हे गुण प्रामुख्यानें आढळतात.

| | |
|---|---|
| पृ. १ ओ. १ | शारदियेचिये चद्रकळे मार्जी शरदृतूतील चांदण्यांत. |
| .... २ | मनें मवाळें—हळुवार अत.करणानें, चकोरतलगें—चकोराचीं पिलें. |
| .. ... ५ व ६ | हें (गीतेंतलें तत्त्वज्ञान) खरोखर शब्दाशिवाय सागितलें जातें, इद्रियाना न कळता हें अनुभवास येतें आणि शब्द कानावर पडण्यापूर्वीच त्यांचा आशय आकलन केला जातो. |
| ... ... ७ | कमळदलें नेणती—कमळाना कळत नाहीं. |
| ... ... ८ | परी—प्रकार, सेविती—सेवन करणारे, रसिक. |
| ... ... ९ | ठावो न साडिता—जागा न सोडता, चद्रु प्रगटता—उगवता चद्र, |
| .. ... ११ व १२ | ऐसेनि.. आथिला—तेव्हा याप्रमाणें गाभीर्य आणि स्थैर्य यानीं ज्याचें अत करण युक्त असेल. मानू जाणे—मान्य करणें, जाणतो. इये—म्ह० (या गीतेला) |
| ... ... १३ | अर्जुनाचिये ..होती—अर्जुनाच्या पक्तीस बसण्यास जे योग्य असतील. |
| .. ... १४ | तिहीं सर्ती—त्याच सज्जनानीं. |
| ... ... १५ व १६ | (येथें ज्ञानेश्वराचा विनय व्यक्त झाला आहे. ते म्हण तात मीं श्रोत्यांच्या योग्यतेचा प्रश्न उपस्थित केला.) |

पृ. १ ओ. १५ व १६ यांत अवास्तव सलगी झाली खरी. परंतु ते सर्वश्रेष्ठ उदारहृदय आहेत म्हणूनच मी त्यांच्या चरणांना लागून ही विनंती केली आहे.

... ... १८ आथी—( ' अस्ति ' असून ) असतो.

... ... १९ तैसा...सज्जनीं—तुम्हा सज्जनांकडून माझा स्वीकार केला गेला आहे.

... ... २० *तर माझें उणें सहज सहन करा अशी प्रार्थना कशास करूं?*

... ... २१ आणीक—दुसरा; अन्य.
गीतार्थु...पाहें—( संस्कृत ) गीतेचा अर्थ ( सामान्य मराठींत ) आणूं पाहात आहें.

... ... २२ ते अवधारा....म्हणौनियां—म्हणूनच तें ( भाषांतर ) सावध ऐका अशी विनंती आहे.

पृ. २ ओ. २३ हें म्ह० ( गीतेचें मराठीकरण )
अनावर—आवरण्यास कठीण;माझ्या आवाक्याबाहेरचें.
धायांचि धिंवसा—भलताच धीटपणा.
उपनला—उत्पन्न झाला.

... ... २४ नाहीं तर सूर्याच्या प्रकाशापुढें काजव्याची शोभा ती काय! मूळ संस्कृतार्थ हा सूर्यासारखा तर मराठी अर्थ हा काजव्यासारखा असा आशय. खद्योत—काजवा.

... ... २५ व २६ ( विशाल ) समुद्रांत ( चिमुकली ) टिटवी आपल्या (इवल्याशा) चोचीनें माप शिरवून बघते. तसेंच माझ्या-सारख्या अज्ञ मनुष्यानें या कार्यास प्रवृत्त होणें आहे.

... ... २७ व २८ ऐका, आकाशाला कवळावयाचें असेल तर कवळ-णारानें त्यापेक्षां मोठें झालें पाहिजे.
अपाड हें—हें ( कार्य ) आटोक्याबाहेरील आहे.
निर्धारितां—विचार केला तर.

... ... २९ हें—म्ह० गीतेंतील तत्त्वज्ञान. अपार—निर्मर्याद.
कैसेनि कवळावें—( मराठींत ) कसें आणावें.
घवळावें—दवळावें, घुसळावें.

| | |
|---|---|
| पृ. २ ओ. ३० | मशक—मच्छर. मच्छरानें आकाशाला मुठींत करें धरें ठेवावें ( ओव्या ९ ते १९ मधें ज्ञानेश्वरांनीं निरनिराळ्या दृष्टान्तांनीं आपला विनय व्यक्त केला आहे.) |
| ... ... ३१ | सधरु—धीरानें. |
| ... ... ३२ | श्रीगुरु—( म्ह० ) निवृत्तिनाथ. हे ज्ञानेश्वराचे ज्येष्ठ बंधु व गुरु. |
| ... ... ३४ | ( येथें ज्ञानेश्वराची नम्रता दिसते ) ते विनयानें म्हणतात, " मी मूर्ख असलों आणि यदाकदाचित् हें कार्य करताना माझ्याकडून अविचार घडला ( मला नीट अर्थ उमगला नाहीं आणि मी अविचाराच्या अंधारात चाचपडू लागलों ) तरी त्यातून मला खऱ्या अर्थाचा मार्ग दाखविण्यासाठीं संतांच्या कृपेचा दिवा उजळलेला आहे. " |
| ... ... ३७ | सिद्धसरस्वती—प्रत्यक्ष सरस्वती. |
| | तरी...भारती—तर मुक्याला वाचा फुटते. |
| ... ... ३८ | एथ . ......कायी ! — एकेका वस्तूचे ठिकाणीं असें विशिष्ट सामर्थ्य असतें, तेव्हा त्याच्या परिणामानें आश्चर्यचकित होण्याचें काहीं कारण नाहीं. |
| ... ... ३९ | कामधेनु ज्याच्यापाशीं असते त्याच्या इच्छा पूर्ण होतात असा संकेत आहे. येथें ज्ञानदेवांनीं अप्रत्यक्षपणें आपली गुरुमाउली आपल्या सर्व इच्छा तृप्त करण्यास समर्थ आहे असें सुचित केलें आहे. |
| ... ... ४० | म्हणऊनि . ...इये—म्हणूनच मी ( ज्ञानेश्वर ) ही मराठी टीका लिहिण्यास प्रवृत्त झालों आहें. |
| ... ... ४१ | न्यून—उणें |
| ... ... ४२ | सरतें करूनि घ्यावें—प्रसंगोचित सुधारून घ्यावें; कमीअधिक आपणच पाहावें. |
| ... ... ४३ | तुम्हीं...बोलेन—तुम्हीं उत्तेजन दिलें म्ह० हुंकार दिला, माना डोलावल्या कीं मला उत्तेजन मिळेल. |

पृ. २ ओ. ४४ चेष्टे—हालचाल करतें.
सूत्राधीन—सुताच्या तावेदारींत.
दारुयंत्र—कळसूत्री बाहुलें.

... ... ४५ व ४६ ( येथें ज्ञानेश्वरांचा अत्यंत विनीत भाव दिसतो ) ते म्हणतात, " मी तुम्हां श्रोत्यांचा अनुग्रहित आहें. मी तुमचा अंकित आहें. तुम्हांला रुचेल त्याप्रमाणें तुम्ही मला अलंकृत करा. "

२ संत :

गीतेच्या बाराव्या अध्यायांतील ' अद्वेष्टा सर्वभूतानां ' या तेराव्या श्लोकावर भाष्य करतांना ज्ञानेश्वरांनीं सत्पुरुषांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. हा भाग तेथूनच घेतला आहे. खरा संत कोण तें यावरून दिसेल.

पृ. ३ ओ. १ कहीं—कुठें.

... ... २ चैतन्याला ज्याप्रमाणें ' हा आपला व हा परका ' असा भेदभाव दिसत नाहीं त्याप्रमाणें जो असतो.

... ... ५ व ६ ज्याप्रमाणें प्राणवायु मी राजाच्या शरीरांत राहीन पण दरिद्रयाच्या शरीरांत राहणार नाहीं असें म्हणत नाहीं त्याप्रमाणेंच जो भेदभाव न करतां सर्वांवर कृपा करतो.
चाळूं—चालना देणें, चलित करणें.
परौतें गाळूं—पलिकडे टाकून देऊं.
प्राणु—प्राणवायु.

... ... ७ व ८ पाणी ज्याप्रमाणें ' गाईची तहान हरण करीन पण वाघाला विष होऊन मारीन ' असें कधीं म्हणत नाहीं.
तोय—पाणी.

... ... १० कृपेची धात्री—धात्री म्ह० दाई. अर्थात् जो समभावानें दाईप्रमाणें कृपा करतो.

... ... ११ आणि......म्हणे—ज्याला ' हा मी व हें माझें ' ही ( स्वार्थाची व अहंकाराची ) भाषा ठाऊक नसते.

... ... १३ व १४ त्याप्रमाणेंच क्षमेच्या बाबतींत जो पृथ्वीच्या बरोबरीचा असतो आणि जो संतोषास आपली मांडी घर म्हणून देतो ( अर्थात् जो क्षमाशील व संतुष्ट असतो ).

पवाडु—कीर्ति ( अर्थात् क्षमेबाबत जो पृथ्वीप्रमाणें कीर्तिवंत आहे ).

उत्सग—मांडी.

पृ. ३ ओ. १५ ( येथून पुढें 'संतुष्टः सततं योगी' या चवदाव्या श्लोकावरील भाष्य आहे. )

वार्षियेवीण—पावसाच्या वर्षावावाचून.

निर्भर—परिपूर्ण, तुडुंब.

... ... १६ निरुपचारु— उपचाराशिवाय, आपोआप.

... ... १७ जो प्रतिज्ञापूर्वक आपलें अंतःकरण ताब्यात ठेवतो.

आण—प्रतिज्ञा; शपथ.

धरी अंतःकरण—अंतःकरण आयत्न धरतो.

... ... १८ साचपण—खरेपण, सत्यता.

... ... १९ जीवु परमात्मा—जीव व शिव.

... ... २१ योगसमृद्धि होऊनि—योगयुक्त होऊन, योगी होऊन.

निरवधि—सर्वस्वीं; पूर्णतया.

... २३ निर्वाळलेयाहि—बळकट झाल्यामुळें, दृढ झाल्यामुळें.

चांगु—चांगल्या प्रकारें.

... ... २४ अनुरागु—भक्ति.

तरि... जया–माझ्या भक्तीच्या प्रेमात जो रंगला आहे

३ पसायदान :

अठरावा अध्याय पूर्ण झाल्यानंतर उपसंहारांत ज्ञानेश्वरांनीं परमेश्वरापाशीं पुढील प्रसाददान मागितलें आहे. त्यात त्यांच्या उदार अंतःकरणाचें व विशाल वृत्तीचें दर्शन घडतें

पृ. ४ ओ. १ व २ आता अखिल विश्वाचा आत्मा जो परमेश्वर त्यानें माझ्या या वाङ्मययज्ञानें म्हणजे भावार्थदीपिकेनें संतुष्ट होऊन *मला एवढेंच प्रसाददान द्यावें*—

... ... ३ व ४ कीं दुर्जन आपल्या वक्रदृष्टीचा त्याग करोत आणि त्यांच्या ठिकाणीं सत्कार्यासंबंधींची प्रीति वृद्धिंगत होवो, व सर्व प्राणिमात्रांत जिवाभावाची मित्रता उत्पन्न होवो.

व्यंकटी—वक्रदृष्टि.

पृ. ४ ओ. ५ व ६ पापाचा अंधार नाहींसा होवो, आणि विश्व स्वधर्माच्या प्रकाशानें उज्ज्वल होवो, व प्राणिमात्रापैकीं ज्यास जी इच्छा असेल ती पूर्ण होवो.
दुरित—पाप.

... ... ७ व ८ आणि जे जे मंगल असेल त्याचा त्याचा वर्षाव करणारा जो संतसमाज तो या भूतलावर या प्राणिमात्राला सदैव भेटो.
मांदियाळी—समुदाय.
अनवरत—सदैव.

... ... ९ व १० हे संत म्हणजे ( जणूं कांहीं ) चालते कल्पवृक्षच किंवा त्यांचे अंकुर आहेत, किंवा हे चैतन्यरूपी चिंतामणीचे गांव आहेत, किंवा हे अमृताचे बोलते सागरच आहेत.
आरव—अंकुर.
अर्णव—सागर.
( कल्पवृक्ष व चिंतामणि कामधेनूप्रमाणेंच इच्छा तृप्त करतात असा संकेत आहे. )

... ... ११ व १२ ( हे संत म्हणजे ) कलंकहीन चंद्रमे आहेत किंवा तापहीन सूर्य आहेत. ते सर्वांचे सतत सोयरे होवोत.

## २ एकनाथ ( इ. स. १५३३–१५९९ ) :

एकनाथांच्या जन्मशकाबद्दल दोन मतें आहेत. एका मतानुसार त्यांचा जन्म इ. स. १५४८ मध्यें झाला. परंतु परंपरागत मतानुसार तो इ. स. १५३३ मध्यें झाला. तेव्हां तोच मानणें रास्त होय. नाथांचे आईबाप त्यांच्या बालपणींच वारले. तेव्हां त्यांचें संगोपन त्यांचे आजे चक्रपाणी यांनीं केलें. नाथ हे पैठणचे राहणारे. तेव्हां पैठण संस्कृत विद्येचें माहेरघर होतें. साहजिकच नाथांसारख्या बुद्धिमान् आणि श्रद्धावंत व्यक्तीच्या मनावर त्या विद्येच्या संस्कृतीचे संस्कार झाल्यावांचून राहिले नाहींत.

नाथांचे गुरु जनार्दनस्वामी. हे देवगडास असत. त्यांच्याकडून नाथांना प्रपंच करून परमार्थ कसा साधावा ही शिकवणूक मिळाली. नाथांच्या पत्नीचें

नाव गिरिजाबाई. या दपर्तीस दोन मुली व एक मुलगा झाला. मुलगा हरि पडित सस्कृत भाषेचा अभिमानी होता. नाथ मराठींत ग्रथरचना करतात हें त्याला मान्य नव्हतें. म्हणून आरभीं आरभीं त्यानें नाथाशीं विरोध केला. परतु पुढें लवकरच हा विरोध मावळला व पितापुत्र याचा एकोपा झाला. कविवर्य मुक्तेश्वर हा नाथाच्या थोरल्या मुलीचा मुलगा. आजानें आध्यात्मिक ग्रथ रचून मराठीस समृद्ध केलें, तर नातवानें आख्यानक ग्रथ रचून तिला सपन्न केलें

नाथाचें बहुतेक आयुष्य पैठणात गेलें. इ. स. १५७० ते १५७३ त्याचें वास्तव्य उत्तरेंत काशीस होतें. तेथेंच त्यानीं आपला भागवत हा ग्रथ लिहून पूर्ण केला. सुरुवातीस तेथील कर्मठ पडिताकडून नाथाच्या ग्रथरचनेच्या कार्यास खूप विरोध झाला. परतु तो लिहून होताच त्याच विरोधकानीं पालखींतून त्या ग्रथाची मिरवणूक काढली. अशा रीतीनें नाथाना ग्रथकार म्हणून बहुमान मिळाला.

नाथ हे शाति, दया, अक्रोध, समता इत्यादि गुणामुळें साक्षात् स्थितप्रज्ञच होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याचे हे सद्गुण प्रदर्शित करणाऱ्या अनेक कथा आज पिढ्यान्पिढ्या महाराष्ट्रात प्रचलित आहेत.

एकनाथानीं विपुल व विविध ग्रथरचना केली आहे. त्यात चतुःश्लोकी भागवत, रुक्मिणीस्वयवर, भावार्थ रामायण आणि एकादश स्कदावरील टीका म्हणजेच सुप्रसिद्ध एकनाथी भागवत हे ग्रथ प्रमुख होत. एकनाथी भागवत ही भागवताच्या एकादश स्कदावरील मराठी टीका होय. हिचें स्वरूप अतिशय प्रचड आहे. एकनाथ जेव्हा झाले तो काळ महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक दुरवस्थेचा होता. त्या काळीं नाथानीं आपल्या सदाचरणानें व ग्रथलेखनानें जनतेला सन्मार्ग दाखवला म्हणून त्याचें व त्याच्या ग्रथाचें माहात्म्य विशेष आहे.

एकनाथाची वाणी धीरगभीर आहे. तत्त्वप्रतिपादनाची त्याची शैली साधी व सरळ आहे, त्यामुळें ससारी जनात त्याचें भागवत प्रिय आहे.

## ४ संस्कृत आणि मराठी :

या उताऱ्यातील काहीं भाग २९ व्या व काहीं भाग १३ व्या अध्यायातील आहे. त्याच्या काळीं सस्कृतज्ञ पडिताकडून मराठी ग्रथरचनेस विरोध होत असे. मराठी भाषेची ते 'प्राकृत, प्राकृत' म्हणून हेटाळणी करीत. नाथ संस्कृत व मराठी या दोन्हींचे अभिमानी होते. येथें त्यानीं निरनिराळ्या उपमा-दृष्टान्तानीं मराठीची वकिली केली आहे.

| | |
|---|---|
| पृ. ५ ओ. २ | अहंता...परमार्थी—परमेश्वरप्राप्तीच्या मार्गात हा अहंकार म्हणजे पाप आहे. |
| ... ... ३ | वैरागर—रत्नांची खाण; अवचटें—एकाएकीं; अनर्घ्य—मूल्यवान्. |
| ... ... ४ | सांडावें—टाकावें. |
| ... ... ५ | सामान्य लोकांना संस्कृत भाषा शिकण्यास कठीण असल्यामुळें 'संस्कृत-आटाटी' म्हणजे ती शिकण्याचा व कळण्याचा 'खटाटोप' असा प्रयोग केला आहे. |
| ... ... ८ | भाषेला महत्त्व नसून तिच्यांतील विषयाला महत्त्व आहे हा आशय. |
| ... ... ९ | रिगमू—प्रवेश. |
| ... ... १० | प्राकृत—बहुजनसमाजाची बोली अर्थात् येथें मराठी. |
| ... ... ११ | सूर्याच्याच प्रकाशांत सूर्याचें दर्शन होतें. त्याचप्रमाणें संस्कृतांत काय किंवा मराठींत काय विषय एकच आहे. तो म्हणजे परमार्थाचा हा आशय. दोन्हीं भाषांत परमेश्वरविषयक एकच विवेचन आहे. |
| ... ... १४ | कुहजकु—कुजलेलें. |
| ... ... १७ | सनकादिक—शुक, सनक हे पूर्वकालीन तत्त्वज्ञानी होते. त्यांनीं संस्कृतांतून आपलें तत्त्वज्ञान सांगितलें. तेंच मराठींत आहे. ( भागवत शुकाच्या नांवावर आहे. म्हणून हा उल्लेख असावा ) |
| ... ... १९ | सुणें—कुत्रें. |
| पृ. ६ २५ व २६ | आरसा डोळ्यांनीं पाहावा लागतो. आणि त्यांत डोळ्यांनींच डोळे पाहावे लागतात. त्याचप्रमाणें हें परमार्थविषयक ज्ञान पाहणारांनीं पाहावें. म्हणजे जसें संस्कृत ग्रंथांत पाहिलें तसेंच तें मराठींत पाहावें. |

**५ दोघे गुरु : पर्वत आणि समुद्र :**

हे दोन निरनिराळे उतारे अनुक्रमें भागवताच्या सातव्या व आठव्या अध्यायांतील आहेत. दत्तात्रेयांनीं एकूण चोवीस गुरु करून प्रत्येकाकडून

काहीं ना काहीं तरी गुण घेतला. त्यापैकीं पर्वत आणि समुद्र याच्याकडून जे गुण घेतले ते या दोन उताऱ्यात दिले आहेत.

| | |
|---|---|
| पृ. ६ ओ. १ | निकर—समूह, समुदाय. |
| ... ... २ | नाना अर्थे—निरनिराळ्या अनेक कारणासाठीं. |
| ... ... ५ व ६ | दाता उदार असल्यास परमेश्वर त्याला काहीं कमी पडूं देत नाहीं. तो परमेश्वर कोणतीहि शंका मनात न धरता सारखा पुरवठा करतो. ( म्हणजेच देवानें दिलेलें सरत नाहीं व मनुष्यानें दिलेलें पुरत नाहीं. ) |
| ... ... ९ | साधक—ज्याला साधु व्हावयाचें आहे तो; परमेश्वर-प्राप्तीच्या साधनाचा अवलंब करणारा. |
| ... ... ११ | चाड–आवड, हौस; रोकडा–संपूर्ण. |
| ... .. १२ | अवघडा.. साकडा—कठीण संकटात शिरतो. |
| ... ... १४ | योगिया—योगी, परमार्थसाधन करणारा. |
| ... ... १६ | कृतोपकार...केलें—जगाला उपकारानीं धन्य केलें, कृतज्ञ केलें. |
| ... ... १८ | निजबोधें—आत्मज्ञानामुळें. |
| पृ. ७ ... १९ | मीनल्यां ..अतिनिर्मळ–नद्याचें गढूळ पाणी मिळालें तरी निर्मळ समुद्र कोपत नाहीं. डहुळणें–रागावणें; कुपित होणें. |
| ... ... २२ | वेला—समुद्राची सीमा, मर्यादा. नुल्लघी—ओलांडीत नाहीं. |
| ... ... २३ | मळ—( येथें ) फेस, घाण. |
| ... ... २४ | निर्धारीं—निश्चित. |
| ... ... २५ व २६ | जेथें समुद्राला ताम्रपर्णी नदी मिळते तेथें मोत्याच्या खाणी आढळतात. त्याचप्रमाणें योग्याच्या ठिकाणीं श्रद्धा उत्पन्न झाली म्हणजे मोक्षाची इच्छा करणाऱ्या त्याला ‘ मुक्ति ’ रूपी खाण प्राप्त होते. ( ताम्रपर्णी हें नदीचें नाव. मात्र ही नदी कोणती तें कळत नाहीं. ) |

पृ. ७ ओ. २५ व २६ मुमुक्षु—मोक्षाची इच्छा करणारा.
मिनली—( ' मीलन ' पासून ) मिळाली.
... ... २८ लाहे—लाभतो, प्राप्त करतो; समाये—समाविष्ट होतो.
... ... २९ सरितांचे यावे— ( म्ह० येणारे ) ओघ, प्रवाह.
... ... ३० खंती—दुःख, त्रास; आपांपती—समुद्र.
... ... ३५ व ३६ ( योगी ) दारिद्र्य आणि ऐश्वर्य यांस समानच मानत असतो. ( कारण ) संसारांत तो आसक्त नसतो. आत्मज्ञानामुळें तो पूर्णतया परमेश्वरांत निमग्न असतो.

३ तुकाराम ( इ. स. १६०८–१६५० ) :

पुण्याजवळील इंद्रायणीच्या काठावरील देहू हें तुकोबांचें जन्मग्राम. त्यांच्या वडिलांचें नांव बोल्होबा व आईचे नांव कनकाई. त्यांचा व्यवसाय वाण्याचा होता. एका दुष्काळांत तुकोबांचे अनेक नातलग मृत्युमुखीं पडले. त्यांची पहिली बायकोहि मरण पावली. त्यामुळें तुकोबा विरक्त झाले. व्यवसायांत त्यांचें चित्त लागेना. त्यांची दुसरी बायको जिजाई व्यवहारी होती. त्यामुळें प्रपंचांत तुकोबांचे तिच्याशीं वारंवार खटके उडत. परंतु आपल्या पत्नीवर व मुलांवर त्यांचें अतिशय प्रेम असे.

तुकोबांचें सारें आयुष्य भजनपूजनांत व कथाकीर्तनांत गेलें. पंढरपुरचा विठोबा—त्यांचें आराध्यदैवत होतें. त्यांच्या अभंगांत या दैवताची आत्यंतिक निष्ठा आढळून येते.

तुकोबांना सोंगाढोंगांचा तिटकारा वाटे. स्वार्थ, अधर्म, अनीति, अत्याचार इत्यादिकांबाबत त्यांचा विशेष कटाक्ष असे. दीन व दरिद्री मनुष्यांबद्दल त्यांना कळवळा वाटे. त्यांच्या अभंगांत त्यांनीं सामाजिक अन्यायांवर तीव्र शस्त्र उपसलें आहे. त्यांची वाणी अटपट असली, तरी मर्मभेदक व जोरकस आहे. त्यांच्या स्पष्टवक्तेपणामुळें समाजांतील शिष्टांनीं व दुष्टांनीं त्यांचा बराच छळ केला. तो सर्व तुकोबांनीं निमूटपणें सहन केला. परंतु आपलें नीत्युपदेशाचें व समाजसुधारणेचें कार्य त्यांनीं सोडलें नाहीं.

तुकोबांच्या अभंगांत मनुष्यस्वभावाचें मार्मिक ज्ञान प्रकट झालें आहे. त्यांचें भाविक अंतःकरण उचंबळून आलें कीं, त्यांच्या वाणीची अभंगगंगा दुथडी भरून ओसंडून वाहूं लागे. वेगवेगळ्या प्रसंगीं त्यांची जशी जशी वृत्ति असेल, तशी तशी त्यांची भाषा मऊ अथवा कठोर उतरली आहे. त्यांचें

शब्द मार्मिक, समर्पक आणि थोडक्यांत पुष्कळ अर्थ प्रकट करणारे आहेत. आजदेखील त्याच्या भाषेचा प्रभाव पूर्वीप्रमाणेंच कायम आहे.

तुकोबानीं संपूर्ण असा एखादा ग्रंथ रचलेला नाहीं. कीर्तनप्रसंगीं त्याच्या मुखातून अभंग बाहेर पडत. तेच त्याच्या सहकाऱ्यानीं टिपून ठेवले आहेत. या अभंगाच्या संग्रहालाच ' तुकोबाचा गाथा ' असें नाव आहे. अभंग हे कीर्तन-प्रसंगीं स्फुरल्यामुळें गेय आहेत. त्याची रचना त्रुटित व सुटसुटीत आहे. प्रत्येक अभंगाचें स्वरूप स्वतंत्र आहे. त्यात ईशस्तुति, उपदेश, स्वानुभव, संत व असंत लक्षणें किंवा सामाजिक टीका यापैकीं कोणता तरी एखादा विषय आहे.

याच निरनिराळ्या विषयावरील काहीं निवडक अभंग पुढें दिले आहेत.

६ ईशस्तुति :

या अभंगात ईश्वराच्या स्वभावाचें अनुभवजन्य सुंदर वर्णन आहे.

पृ. ८ ओ. ३ काशाची ( जुनें रूप )—कशाची ?

.. .... ४ तुझेंच नाव तुझ्यावरून ओवाळून टाकतों. तुझ्या-सारखा तूच आहेस. ( असम अलंकार )

... ... ५ गोड अमृत तूं निर्माण केलेंस. पण तूं तर त्यापेक्षाहि गोड आहेस.

... ... ७ तुझ्या थोरवीचें शब्दानीं अधिक वर्णन करीत नाहीं. मुकाट्यानें तुझ्या पायावर डोकें ठेवून तुला नमस्कार करतों म्हणजे झालें !

७ सज्जन :

(१) पृ ८ ओ. २ थोरीव—मोठेपणा.

... ... ४ संताचें स्वतःच्या नश्वर शरीरावर प्रेम नसतें. प्राणि-मात्रावर दया करणें हेंच त्याचें भांडवल आहे.

भूत—प्राणिमात्र.

... ... ५ पराविया मुखें—दुसऱ्याच्या मुखानें.

अमृत....स्रवतसे—संताच्या मुखानें जो उपदेश बाहेर पडतो तो इतका मधुर असतो कीं, जणूं कांहीं त्याच्या मुखानें प्रत्यक्ष अमृतच पाझरत असतें.

| | |
|---|---|
| (२) पृ. ८ ओ. १ | रंजले गांजले—दुःखित झाले; पीडित झाले.<br>नवनीत—लोणी. ( उपमा आहे )<br>आपंगिता—आश्रयदाता, आधार. |
| पृ. ९ ओ. ६ | भगवंताची मूर्ति—( म्ह० ) प्रत्यक्ष देवच. |
| (३) ... १ | प्राणिमात्रांचें पालन हीच देवाची पूजा होय आणि अनेकांशीं मत्सर करणें हाच खरा शीणभाग होय. |
| ... ... २ | रुसणें फुगणें इत्यादि त्रासदायक प्रकार करावयाचे असतील तर ते स्वतःवर करावे. परंतु हे प्रकार वर्ज्य केल्यावर जो एकमेव आनंद उरतो तो म्हणजेच परमेश्वर असा अर्थ. |
| ... ... ३ | जर सर्वांच्या जीवांशीं एकजीव होतां आलें तरच त्या अवस्थेला संतपण हें नांव देतां येईल असा आशय. |
| (४) ... १ | अहंकार व आशा समूळ नष्ट झाल्या तरच शरीराला चिंतामणीची योग्यता येईल. |
| ... ... २ | ज्याच्या ठिकाणीं निंदा, हिंसा, कपट व देहाविषयींचें ममत्व नसेल तोच स्फटिकाप्रमाणें निर्मळ आहे. ( उपमा ) |
| ... ... ३ | मोक्षाचें...वाराणसी—त्याला काशी तीर्थाला जाण्याचें अथवा मोक्ष मिळविण्याचें कारण नाहीं. |
| ... ... ४ | मोक्ष...दर्शनें—त्या मनुष्याच्या दर्शनानेंच मोक्ष मिळतो. |
| ... ... ५ | मन...भूषणांसी—पवित्र मन हेंच सर्व भूषणांचें भूषण असल्यावर मग शोभेसाठीं माळांची काय आवश्यकता आहे ! |
| ... ... ६ | ' गर्जताति ' नको. ' गर्जताहे ' हवें. |
| ... ... ८ | आगळा—अधिक;<br>महिमा—मोठेपणा ( मूळशब्द पुल्लिंगी आहे. पण येथें तो स्त्रीलिंगी आहे. ) |
| (५) ... १ | गंगेच्या पाण्याच्या ठिकाणीं पाठ निराळी व पोट निराळें असा भेद नाहीं. तें पाणी खालीं वर एकच आहे. |

(५) पृ. ९ ओ. २ रवि, दीप ( आणि ) हिरा काय कालिमा जाणें ? असा अन्वय. म्हणजे या तीन वस्तु उज्ज्वल आहेत. आणि कुठें अंधार असल्यास त्या तो दूर करतात.

... ... ३ कापुराचा चूर म्हणजे काहीं कण्याचा कोंडा नाहीं समुद्रात काहीं पाणी मिळविलें म्हणजे तो विशाल होत नसतो.

... ... ४ परिस व चिंतामणि हे काहीं इतर पाषाणासारखे नाहींत असा अर्थ.

... ... ५ ज्याप्रमाणें आकाश सर्वत्र संपूर्ण असतें. कुठें आहे, कुठें थोडें आहे किंवा कुठें अगदींच नाहीं असा प्रकार नसतो. त्याचप्रमाणें संत सदा सर्वकाळ सर्वांशीं सारखेच असतात. त्याना भेदभाव ठाऊक नसतो असा अर्थ.

(६) ... १ परिसा.. अंग—परिस संपूर्णच चांगला असतो. त्याचा अमूक भाग चांगला व तमूक भाग वाईट असा प्रकार नसतो.

(७)पृ.१०ओ.१ व २ वाचे . घणीं—घणाचा घाव घातला असताना जो वाचतो म्हणजे टिकतो. त्यालाच खरें मूल्य असतें. बनावट हिऱ्याचा भुगा होतो. करणीचा ( हिरा ) म्ह० बनावट हिरा.

... ... ३ मोहरा—एक प्रकारचा खरा हिरा. तोच जर काचेचा बनावट असेल, तर त्यानें तो उन्हात धरला असता सूत जळतें.

(८) .... १ पतें—तात्या पंतोजीनें, प्राथमिक वर्गाच्या शिक्षकानें. ( शिक्षकाला लिहिता येतें. परंतु लहान मुलाला वळण लागावें म्हणून तो स्वतः त्याच्याबरोबर अक्षरें गिरवितो. )

... ... २ संत स्वतः जातीनें कार्य करतात व इतराना धडा घालून देतात.

(८) ... ३ आईला चालतां येत नाहीं असें थोडेंच! परंतु आपल्या लहानग्याला चालयला शिकवितांना ती स्वत: बळेंबळेंच 'चाल चाल माते, पायीं मोडले कांटे' अशीं पावलें टाकीत असते.
बाळकाचे चाली—मुलाच्या चालीनें.

... ... ४ लोकांना पाण्यांत जागा असावी म्हणून नाव त्यांत तरंगते. ती लोकांना पाण्यांत कसें पोहावें याची कल्पना देते.

८ दुर्जन :

(१) पृ. १० ओ. २ चवी (जुना प्रयोग)—(आतां चव) रुचि.

... ... ३ शुद्ध—पवित्र, सदाचरणी.

(२) ... १ भूतें...अंगास—अंगांत पिशाच्च संचार झाल्यासारखें करणें, भूतबाधा.

... ... २ आत्मखुण—आत्मज्ञान.

... ... ३ शकुन सांगणें—ज्योतिष सांगणें.

... ... ४ मैंद—ढोंगी, लबाड.

(३) ... १ जळो जळो—धिक्कार असो.
चेलेपण—शिष्यत्व.

... ... २ (येथें तुकोबांनीं पोटभरू ढोंगी गुरूंवर टीका केली आहे. हे गांवोगांवीं हिंडून शिष्य करीत आणि स्वतःचें पोट भरावें म्हणून त्यांच्याकडून वर्षासनें घेत. तीं न मिळाल्यास ते वसुलीसाठीं शिष्यांचा पाठलाग करीत आणि शिष्य कुठें तरी खिंडारांत लपून बसत. त्या परिस्थितीस अनुलक्षून हा अभंग आहे.)
वेशीद्वारीं—गांवाचे सीमेवरील प्रवेशद्वार.
खिंडोरीं—(खिंडारीं द्वेवें.) भिंतीच्या पडक्या भागांत

९ अनुभवाचे उद्गार :

(१) पृ. ११ ओ. १ ज्याच्या उच्चारांत व आचारांत एकवाक्यता आहे तोच वंद्य आहे. ...

पृ. ११ ओ. २ त्याचें मी स्वतः अंगण झाडीन किंवा ' अंगें ' याचा अर्थ माझ्या शरीराची केरसुणी करून मी त्याचें अंगण झाडीन असाहि करता येईल.

... ... ३ किंकर—' काय करूं ! ' असें विचारतो तो, अर्थात् चाकर.

... ... ४ तुकाराम म्हणतात ज्याच्या अतःकरणात देवाचें वास्तव्य आहे त्याच्या पायापाशीं माझा भक्तिभाव आहे.

(२) ... १ ( या अभंगात तुकाराम महाराजानीं निसर्गातील एकान्ताच्या आनदाचें वर्णन केलें आहे. ) ते म्हणतात, " वनातील झाडें, वेली आणि पशुपक्षी हेच तेथें आमचे आप्त आहेत. तेथें मनोरंजनासाठीं पक्ष्यांचीं मंजुळ गाणीं आहेत.

... ... २ या निरनिराळ्या आनदांमुळें मला एकान्तवास प्रिय आहे. शिवाय एकान्तात नसते गुणदोष अंगास चिकटत नाहींत.

... ... ३ तेथें वर आकाशाचा मडप आहे. खालीं पृथ्वीची बैठक आहे ( आणि सभोंवतालच्या दृश्यांत ) मन जेथें रमेल तेथें क्रीडासक्त होत आहे.

... ... ४ ( वनातील या एकान्तवासांत ) पांघरण्यास घोंगडी व पाणी पिण्यास कमंडलु आहेत. त्याच्या योगें शरीराचे उपचार भागत आहेत. आणि वाऱ्यामुळें येथें वेळ कोणती आहे म्ह० सकाळ, दुपार कीं संध्याकाळ हें

सावध आहों. सर्वांच्या इच्छा पूर्ण करण्याचें आमच्या ठिकाणीं सामर्थ्य आहे.

(३) पृ. ११ ओ. ३ आम्ही प्रसन्न असलों व एखादीं बाब आम्हांस आवडली तर आम्ही सर्वस्व दान करूं. परंतु न वठणाऱ्या माणसाला मात्र आम्हीं शिक्षा केल्याशिवाय राहणार नाहीं.

... ... ६ ज्याचें ... परि—ज्याची जशी योग्यता असेल तसें त्याचें कोड आम्ही पुरवतों. आम्ही स्वभावतःच सरळ आहों. परंतु ज्याच्यावर कृपा करावयाची तो त्या कृपेस पात्र असला पाहिजे असा आशय.

४ रामदास (इ. स. १६०८–१६८१):

जांबगांवच्या सूर्याजीपंत व राणूबाई या दंपतीचे रामदास कनिष्ठ चिरंजीव. त्यांचें मूळ नांव नारायण. त्यांनीं आपलें पूर्व आयुष्य तीर्थाटनांत, अभ्यासांत व तपांत घालविलें. तीर्थाटनांत त्या काळच्या मुसलमानी सत्तेनें जागोजागीं जे अत्याचार चालवले होते ते त्यांच्या दृष्टीस पडले. बहुजनसमाजाची दुर्दशा पाहून त्यांचें अंतःकरण कळवळलें. देशांतील दास्य, दुःख, दैन्य व दारिद्य लक्षांत घेऊन ते चरकले. त्यांनीं ती दुःस्थिति नाहींशी करण्याकरितां रामाच्या उपासनेचा प्रसार चालवला. महाराष्ट्रांत त्यांनीं जागोजागीं मारुतीचीं देवळें, आखाडे व मठ स्थापन केले. अशा रीतीनें त्यांनीं संघटनेचें कार्य आरंभिलें. आपल्या कवितेंतून त्यांनीं याच कार्याचें महत्त्व सांगितलें.

रामदास स्वतः निवृत्त होते. परंतु आपल्या अनुभूतिपूर्ण काव्यांतून त्यांनीं समाजाला प्रवृत्तीची शिकवणूक दिली आहे. दासबोध हा त्यांचा ग्रंथ प्रपंच व परमार्थ या दोन्हींची शिकवणूक देण्याच्या दृष्टीनें अतिशय उपयुक्त व उपकारक आहे. रामदासांनीं रामायणाचीं सुंदरकांड व युद्धकांड हीं फक्त दोनच कांडें लिहिलीं आहेत. शिवाय त्यांचें स्फुट वाङ्मय विपुल आहे. परंतु त्यांच्या दासबोधाला जी प्रसिद्धि लाभली आहे, ती इतर वाङ्मयाला लाभलेली नाहीं.

'खटासी व्हावे खट आणि घटासी व्हावे घट' या तत्त्वज्ञानाप्रमाणेंच रामदासांची वाणी ओजस्वी व तेजस्वी आहे. त्यांची रचना ओबडधोबड असली, तरी ती त्यांच्या कणखर वृत्तीला साजेशीच आहे. त्यांच्या साऱ्याच वाङ्मयांत भक्तीचा जिव्हाळा आहे. त्यामुळें तें अतिशय लोकप्रिय आहे.

### १० कष्टावीण फळ नाहीं :

या उताऱ्यात रामदासांनीं नित्याच्या व्यवहारातील एक अनुभव सांगितला आहे. तो उपयुक्त नाहीं असें कोण म्हणेल ?

पृ. १२ ओ. ४ कष्टाकडे... हीनजन—जे हलके व दुबळे असतात ते कष्ट करण्याचे टाळतात. त्याना काम करावयास नको.

... ... ६ सुखावती—सुखी होतात, विश्रांति घेतात.

... .. ८ दीर्घसूचनेचें कौतुक—म्ह० दूरदृष्टीचा आनंद, महत्त्व. मनुष्यानें दूरवरचा विचार केला पाहिजे.

... ... ११ या लोकातील साठवलेलें धन व परलोकप्राप्तीसाठीं साधलेलें आत्मज्ञान.

... ... १३ उदंड—पुष्कळ

भाग्य.. टेलें—त्याना प्रत्यक्ष ऐश्वर्य व सौख्य लाभलें.

... ... १४ येर—इतर.

बोल्तचि राहिले—व्यर्थ बडबड करीत बसले.

करंटे जन—अभागी लोक.

... .. १५ व १६ कोणत्याहि गोष्टींत दूरचा विचार हवा. त्याशिवाय सार्थकता नाहीं.

नित्यानित्य विवेक—म्ह० शाश्वत काय आहे आणि अशाश्वत काय आहे याचा सारासार विचार हवा.

### ११ संभाजीस उपदेश :

इ. स. १६८० मध्यें श्रीशिवाजीमहाराज स्वर्गवासी झाल्यावर संभाजी राजे गादीवर बसले. ते उग्र प्रकृतीचे होते. त्यानीं आपल्या वडिलाप्रमाणेंच राज्यशासन करावें म्हणून रामदासानीं त्याना पाठविलेलें हें पत्र आहे.

पृ. १२ ओ. १ दुश्चित्त—असावध.

.. ... २ तजाविजा करणें—योजनापूर्वक विचार करणें.

.. ... ३ उग्रस्थिति सांडावी—तापट स्वभाव सोडावा.

... ... ४ चिंता.. अंतर्यामीं—मनात इतराची काळजी करावी.

... ... ५ व ६ कृतापराधाची क्षमा करून कारभाऱ्याना कामें द्यावीं व सुखी करावें.

पृ. १३ ओ ७ ते १० पाणी एकाच जागीं तुंबून राहणें चांगलें नाहीं. तें खेळत राहिलें पाहिजे. त्याच्याप्रमाणेंच जनसमुदायाच्या मनाचें आहे. तें ओळखतां आलें पाहिजे. त्यांना कार्यभाग दिला पाहिजे.

... ... आटोपला—सफळ झाला.

... ... ११ व १२ पूर्वजार्जित मालमत्तेकरितां आपसांत यादवी केली तर शत्रूचें आयतेंच फावेल.

गलिम-( खरा शब्द 'गनीम' ) म्ह० शत्रु.

... ... १३ दोघांचें भांडण व तिसऱ्याचा लाभ.

... ... १५ सर्वांना प्रसन्न ठेवल्यास नेहमीं कामांची गर्दी राहते.

... ... १६ सांग—सर्व प्रकारें, नीट.

... ... १७ एक करावें—संघटित करावें.

निवडून काढावें—एकूण एक टिपून काढावें.

... ... १८ कीर्ति...दिगंतरीं—कीर्ति दिङ्मंडळांत पसरते.

... ... १९ तडाखे गाजवावे—पराक्रम करावा.

... ... २३ सलगी देऊन-जवळीक दाखवून, आपलेसें करून.

... ... २४ 'लोभांचे' नको. 'लोकांचें' हवें.

... ... २५ व २६ संघटना करून प्रयत्नपूर्वक शत्रूवर चाल करावी.

... ... २७ आहे.. मिळवावें—जुनें सांभाळावें व नवें मिळवावें.

... ... २९ जनतेनें धैर्य धारण करावें आणि तलवार चालवण्यांत म्ह० लढण्यांत कमाल करावी.

... ... ३० आणि अशा रीतीनें मोठमोठे मानसन्मान प्राप्त करावे.

... ... ३१ तो योग—म्ह० शासन कसें करावयाचें तें तप.

... ... ३२ राज्य साधण्यासाठीं किती सावधानतेनें व त्वरेनें कार्ये करावीं लागतात तें पाहावें.

५ मुक्तेश्वर ( इ. स. १५७३–१६४५ ):

*मुक्तेश्वर हा एकनाथांचा नातू म्हणजे मुलीचा मुलगा.* याच्या पित्याचें नांव चिंतामणि व मातेचें नांव गोदावरी. हा आपल्या आजाच्या घरींच पैठणला लहानाचा मोठा झाला. याच्या काव्यांत पैठणच्या व गोदावरीच्या

परिसराच्या अभिमानाचे उद्गार आढळतात. नाथाप्रमाणें यानेंहि दत्त हेंच आपलें उपास्यदैवत मानलें होतें. याच्या काव्यात वारवार येणारें श्रीलीला-विश्वंभर हें जोडनाव दत्ताचेंच निदर्शक असावें.

मराठींत प्रथमच आख्यानक कविता रचून ती लोकप्रिय करण्याचा मान मुक्तेश्वराकडे जातो. त्यानें प्रथम श्लोकवद्ध रामायण रचलें. नंतर शतमुख-रावण-वधाख्यान, मूर्खलक्षणें, एकनाथचरित्र, गीता, अशीं कांहीं स्फुट प्रकरणें व पदें आणि आरत्या रचल्या. परंतु या वाङ्मयात त्याच्या प्रतिभेचें दर्शन होत नाहीं. त्याची अलौकिक प्रतिभा आणि त्याची परिणत प्रज्ञा याचा आढळ त्याच्या महाभारतात होतो. या त्याच्या ग्रंथाचीं आदि, सभा, वन, विराट व सौप्तिक अशीं फक्त पाचच पर्वें उपलब्ध आहेत. शुकरंभासंवाद व हरिश्चन्द्राख्यान हीं त्याचीं दोन आख्यानेंहि प्रतिभासंपन्न आहेत. तीं त्यानें बहुधा महाभारतापूर्वी लिहून आपली लेखणी उजळ करण्याचा प्रयत्न केला असावा. महाभारत व हीं दोन आख्यानें ओवीबद्ध आहेत. या त्याच्या वाङ्मयात वेगवेगळ्या रसाचा परिपोष व भाषेचें सौष्ठव प्रकर्षाला पोंचल्याचें प्रत्ययास येतें.

मुक्तेश्वर हा भिन्न भिन्न शास्त्राचा अभ्यास केलेल्या संस्कृतज्ञ पंडित होता, परंतु शास्त्राभ्यासाचा त्याच्या अगच्या रसिकतेवर विपरीत परिणाम झाला नाहीं हें विशेष. मुक्तेश्वराचें असाधारण कवित्व त्याच्या आख्यानात दृष्टीस पडतें. त्याच्या काव्यात भिन्नभिन्न रसाचा यथायोग्य आविर्भाव झाला असून वाणींतहि योग्य स्थलीं प्रसाद, ओज व माधुर्य या गुणाचें प्रकटन झालें आहे. त्याच्या आख्यानातील शब्दचित्रें मार्मिक असून वर्णनें ठसठशीत व रसरशीत आहेत. या गुणसमुच्चयामुळें रसिकात त्याच्या काव्याची विशेष चहा आहे.

१२ वर्षाकाळ :

हा उतारा वनपर्वाच्या दहाव्या अध्यायातून उद्धृत केला आहे. उतारा लहान असला तरी त्यात सृष्टिवर्णनाची पुष्कळ बहार आहे. या शब्दचित्रात मुक्तेश्वरानें जणू कांहीं पावसाळा सजीव केला आहे.

पृ. १४ ओ. २ — पश्चिमेचा अनिळ—पश्चिमेकडील पावसाळी वारा. मेघमाला मोकली—त्यामुळें ढगाच्या राशी मोकळ्या झाल्या.

... ... ३ व ४ — यात रूपक व श्लेष हे अलंकार आहेत. जलराशीवर पार [illegible] त्याचें [illegible]

पृ. १४ ओ. ३ व ४ मृगांचा पाठलाग करीत असल्याचें सांगितलें आहे. मृग शब्दावर श्लेष आहे. मृग म्हणजे मृग हें पावसाळी नक्षत्र किंवा हरिणें.
सैरा—स्वैर, स्वच्छंद.

... ... ५ या शिकाऱ्याच्या हातांतला तीरकमठा म्हणजेच इंद्रधनुष्य. रोहिणी व मृग हीं नक्षत्रें आहेत.

... ... ७ व ८ येथें सूर्यकिरणांवर मृगांचें रूपक असून तीं भेदरल्या-मुळें ढगांआड लपत आहेत असें वर्णन आहे.

... ... ९ व १० येथें उत्प्रेक्षा आहे. पृथ्वीवर शाळुंखेचा, पर्वतांवर शंकराच्या पिंडीचा आणि पावसावर अभिषेकाच्या जलाचा आरोप केला आहे. इंद्र ही पावसाची देवता, तेव्हा तो हा अभिषेक करीत आहे अशी कल्पना.

... ... ११ कपोतक म्ह० कबूतर; दर्दुर म्ह० बेडूक.
'महाघोष' नको. 'महाघोख' असा पाठ हवा. म्हणजे यमक जुळेल. प्राकृतांत 'ष' चा 'ख' होतो.

... ... १४ गंगा व तिला मिळणाऱ्या उपनद्या यांच्या संघटना-मुळें पूर आले.

... ... १५ अंकुरांवर वस्त्राचें रूपक केलें आहे. पृथ्वी अंकुरांचें हिरवें वस्त्र नेसली अशी कल्पना.

... ... १६ शाका—पालेभाज्या.

... ... १७ व १८ प्रत्यक्ष विष्णु भगवान्‌च मेघाच्या रूपानें चंद्रसूर्यांना साक्षी ठेवून उदक अर्पीत आहेत.
प्रमाण—साक्ष; आप—पाणी.

### १३ भीम व जरासंध यांचें मल्लयुद्ध :

हा उतारा सभापर्वाच्या सातव्या अध्यायांतील आहे. मूळ संस्कृताचीं ताडून पाहिलें असतां मराठी वर्णन स्वतंत्र दिसतें. मुक्तेश्वर महाराष्ट्र स्वराज्योन्मुख असतांना झाला. तेव्हां त्या काळचे मल्ल, आखाडे, कुस्त्या, डावपेंच इत्यादिकांचें हुबेहूब चित्र या वर्णनांत प्रतिबिंबित झालें आहे.

पृ १४ श्लो २ करटी—हत्ती.

१५ ३ व ४ अगस्ती ऋषि ज्याप्रमाणें एकाच आचमनानें विशाल समुद्र प्राशन करण्यासाठीं पुढें सरसावले त्याचप्रमाणें अगात वारश्रीचा अनावर संचार झालेला भीम पहिल्याच पकडींत जरासंधाला गारद करण्यास पुढें धावला

विरश्रीनी लोट्ट—शक्तीचा उचंबळलेला पूर

अतिउद्भट्ट—अनावर व अतिशय

५ व ६ भीम व जरासंध तळहात, गुडघे व दंड थोपटूं लागले पृथ्वीवर त्यानीं पाय आपटताच पर्वताचीं शिखरें डळमळलीं ( अतिशयोक्ति अलंकार )

८ चंड—तीव्र, भयंकर

काळ—प्रत्यक्ष यम

९ वीरगुंठी—मस्तकामागें गाठ देऊन बांधलेली शेंडी.

मागधें—जरासंधानें

१० यमाच्या पाशाप्रमाणें उजवा हात भीमाच्या गळ्यात घातला

दक्षिण—उजवा

सूदला—घातला

१२ कृष्णाची भीमास सावध राहण्याची सूचना

१३ भैरवाकार दृष्टी—भयंकर नजरेनें

वोपिली—मारली

१५ उपमा ताडाच्या विशाल झाडाप्रमाणें जरासंध आदळला

१६ मध्यें कवळिला- ( म्ह० ) जरासंधानें भीमाला कंबरेच्या ठिकाणीं आवळलें मध्य म्हणजे कंबर.

१८ उफराटा—उलट

हुमणी—बुक्की

१९ तवकें—तावडतोब, एकदम

२० लालभडक रक्ताचे हजारों लोट वाहू लागले.

अशुद्ध—रक्त

पृ. १५ ओ. २१ व २२ यांत जरासंधाचा पराक्रम व युद्धाची आवड दाखविली आहे. रक्तप्रवाह तोंडांत जात असतां त्यास अमृताचें प्राशन समजतो.

... ... २४ दशन—दांत.

... ... २५ व २६ बुकया, लाथा, गुद्दे आणि धडका एकमेकांना मोजून मारूं लागले. एकानें दुसऱ्याला मारल्यावर दुसऱ्यानें त्याला पुन्हां मारावयाचें व फेड करावयाची म्हणजे "घे, तूं मला मारतोस ना, घे" असें म्हणत म्हणत उसनें फेडावयाचें.

पृ. १६ ओ. २७ व २८ गुंडाळलेल्या अंगाची उचलबांगडी करून ती डोक्यावर घ्यावयाची या क्रियेचें वर्णन करतांना गुंडाळलेल्या अंगास मोट म्हटलें आहे. तें जमिनीवर भिरकावतांना त्यास मडक्याची उपमा दिली आहे. परंतु भीम व जरासंध दोघेहि असे वीर होते कीं; त्यांच्याच वजनांनीं जमिनीवर पाषाणांचा चुराडा उडत होता. येथील उपमा व अतिशयोक्त वर्णन बहारीचें आहे.

... ... ३० मर्मस्थळें—नाजुक भाग, जागा.

... ... ३२ येरयेरा—एकमेकांच्या.

... ... ३६ पोटांतील आंतड्यांचा गुंता बाहेर काढून तो माळेप्रमाणें एकमेकाच्या गळ्यांत घालण्याची इच्छा करीत होते.

... ... ३७ वर्मस्थळीं लाविती कळे—शरीराचा जो भाग नाजुक असेल त्याला कळ लागून तो दुखेल असा प्रयत्न करीत होते.

... ... ४० इषाळें—ईर्ष्येनें.

... ... ४२ शेष गांगरून पळ काढूं पाहत होता. (अतिशयोकि)

... ... ४३ व ४४ वराह म्हणे....तळवटीं—वराह अवतारांत बुडत असलेली पृथ्वी देवांनीं आपल्या दांतानें वर उचलून धरली. येथें अशी कल्पना केली आहे कीं, भीम व जरासंध यांच्या युद्धामुळें वराहाला अशी भीति पडली कीं, जर माझा दांताचा खांब मोडला तर मग ही भूमि खालीं स्थिर राहील का!

पृ. १६ ओ. ४७ प्रवर्तला म्हणजे येथें जरासंध भीमाला मोठा मार द्यावा म्हणून सिद्ध झाला.

... ... ४९ व ५० मध्यभागीं . दाविला—भीमानें जरासंधाची कंबर घट्ट आवळली, त्याला डोक्यावर उचललें आणि गिरक्या दिल्या.

पृ १७ ओ. ५२ इंद्र ज्याप्रमाणें शिखरावर वज्र टाकून पर्वताचा भंग करतो त्याप्रमाणें

शक्र—इंद्र ( उपमा ).

... . ५३ वामपाद—डावा पाय.

दक्षिणचरण—उजवा पाय.

... .. ५४ सव्यपाद—उजवा पाय.

... .. ५५ आसडणें—उपटणें;

उघडिला—तोडला, दोन तुकडे केले

... ... ५६ रंगभूमिका—आखाड्याच्या भोंवतालचें प्रेक्षागृह.

... . ५७ जरासंधाचा जन्म झाला तेव्हाच त्याचीं दोन अंगें म्हणजे निरनिराळीं शकलें होतीं. तीं पाहून त्याच्या मातापित्याना विषाद वाटला म्हणून त्यानीं तीं दूर उकिरड्यावर फेकून दिलीं. तेथें जरा या नावाची एक राक्षसीण बसली होती. तिनें तीं शकलें जोडताच जरासंध जिवंत झाला. तीं शकलें उलट टाकणें अवश्य होतें. भीमानें जरासंधास ठार केलें. परंतु शकलें सुलट टाकलीं त्यामुळें तो पुन्हा जिवंत होऊन झुजू लागला. अर्जुनाग्रज—अर्जुनाचा मोठा भाऊ म्हणजे येथें भीम

... .. ६१ पाहाटिला—आपटला.

... ... ६२ देहुडीं—देहाचे दोन भाग दोन बाजूला टाकले.

... ... ६४ ' झाला भरवसा माधवा आणि पार्थाग्रजाशीं ' असें हवें. माधव म्हणजे कृष्ण आणि पार्थाग्रज म्हणजे भीम याची खात्री झाली कीं जरासंध आता मृत झाला.

... .. ६६ कुंतीकुमरें—( येथें ) भीमानें.

... ... ६८ स्त्रिया गर्भगलित झाल्या.

६ रघुनाथ पंडित ( शिवकाल ) :

रघुनाथ पंडितांच्या स्थलकालव्यक्तित्वासंबंधीं आजपर्यंत संशोधकांत मतभेद होते. परंतु त्यांच्या काव्याच्या भाषेवरून ते शिवकालांत होऊन गेले हें मात्र आतां निश्चित झालें आहे. मात्र हा नक्की काळ म्हणजे *तिथि*, शक इत्यादि अजून ठरलेला नाहीं. रघुनाथ पंडितांचीं गजेंद्रमोक्ष व रामदासवर्णन हीं दोन काव्यें तंजावरच्या भाऊस्वामी मठांत मिळालीं तेव्हां ते त्या प्रांतांतील महाराष्ट्रीय होते हें उघड आहे. त्या प्रांतीं

म्हातारा बहु जाहलों कवणही त्राता नसे भेटला
भाताची तजवीज तेंच उदरीं भाता गमे पेटला
हातामाजि नसेचि येक कवडी हा ताप आतां हरी
दातारा मज चांचवीं सदय हो मातापिता तूं हरी

हा एक करुणश्लोक त्यांचा म्हणून प्रसिद्धि व प्रसार पावला आहे. त्याचप्रमाणें तेथील आनंदतनय कवि व रघुनाथ पंडित व्याही व्याही होते अशी आख्यायिका आहे. तेव्हां रघुनाथ पंडित दारिद्र्यांत निराश्रित असा राहिला असें दिसतें.

वरील स्फुट रचनेखेरीज या कवीच्या नांवावर दमयंतीस्वयंवर या नांवाचा एक ग्रंथ आहे. आणि त्या ग्रंथामुळेंच महाराष्ट्र सारस्वतांत या कवीचें नांव अजरामर झालें आहे. हा काव्यग्रंथ श्रीहर्षाच्या नैषधाच्या आधारें लिहिला आहे. मराठी वाङ्मयांत *गीता, भागवत, रामायण, भारत* आदि ग्रंथांचीं रूपांतरें विपुल आहेत. परंतु संस्कृत साहित्यांतील अभिजात काव्याचें प्राचीन असें रूपांतर एकच आहे, आणि तें म्हणजे दमयंतीस्वयंवर.

रघुनाथ पंडितांच्या *दमयंतीस्वयंवरांत भिन्न भिन्न छंदांची योजना* केल्यामुळें आणि त्यांत समयोचित अलंकार गुंफल्यामुळें त्यास एक प्रकारची मनोरमता प्राप्त झाली आहे. त्यांच्या रचनेंत डौल आहे, आणि भाषा संस्कृतप्रचुर असली तरी श्रुतिसुगम व सहज समजेल इतपत सुलभ आहे. शिवाय त्यांची वर्णनाची हातोटी अप्रतिम आहे. रघुनाथ पंडितांचें हें काव्य महाराष्ट्रांत अनेक विद्वानांच्या व रसिकांच्या आदरास प्राप्त झालें आहे.

१४ नल आणि हंस :

हा उतारा दमयंतीस्वयंवरांतून निवडला आहे. नलराजा गुप्तचराच्या मुखानें दमयंतीच्या सौंदर्याची व ती त्याच्या कथेच्या ठायीं अनुरक्त असल्याची वार्ता

ऐकतो. त्यामुळें तो बेचैन होतो. त्याला करमत नाहीं. तेव्हा विरंगुळा म्हणून तो शिकारीकरिता नगराबाहेर उद्यानात जातो. त्या प्रसंगाचें हें वर्णन आहे.

पृ. १८ ओ. १ प्रथम ' गमेना ' म्ह० करमेना, चैन पडेना.
द्वितीय ' गमेना ' म्ह० (सुख) वाटेना.

... .. ५ हें नलाच्या घोड्याचें वर्णन आहे. तो जंघाल म्हणजे शीघ्रगामी होता. इतका कीं त्यानें जणू काहीं वाऱ्याच्या सहवासानें त्याची शीघ्रगतीची संवय स्वतःस लावून घेतली होती.
सवे—('संवयी 'चें जुनें रूप)

... . ६ हय—घोडा.

... .. ९ रिघे तेथें—उद्यानात शिरला, प्रवेश केला.
मित—म्ह० दोन चार निवडक.

.. ...११ तामरसानपायें—तामरस + अनपायें. तामरस म्हणजे तांबडीं कमळें अनपाय म्हणजे ज्याना अपाय झालेला नाहीं अशीं, अर्थात् न कोमेजलेलीं, प्रफुल्ल.

.. .. १२ त्या सरोवरात कमळातला मकरंद एकसारखा ठिपकत असावयाचा.त्यामुळें तें उन्हाळ्यातहि रितें नसावयाचें.
तप—उन्हाळा, ग्रीष्म ऋतु.

.. .. १३ ते १६ त्या सरोवरातील एकेका कमळाला हजार हजार पाकळ्या होत्या.त्यावर बसून उदरभर बभर म्हणजे पोटभर भुंगे मकरंद पीत व लक्ष्मीची उत्पत्ति कमळातून आहे म्हणून जणू तेथील कमळ या दोघाचें मंदिर म्हणजे घरच होतें. तेथील कमळाला पाकळ्या हजार व सूर्याचीं किरणेंहि हजार. तेव्हा एका पाकळीला एक याप्रमाणें हजार किरणें हजार पाकळ्याना उमलवीत असत.

.. ...१७ कासार—सरोवर.
राजहंस—राजाचा हंस म्ह० नलराजा.

... ...१८ , वस्तुतः पक्ष्याना ' कळप ' नसतो, ' थवा ' असतो; पण येथें वृत्तसुखार्थ ' कळप.' शब्द योजला आहे.

पृ. १८ ओ. १९ जणूं नलराजानें तेथील हंसांकरितां ती वाटिका म्हणजे तें सरोवर पाणपोईच केली होती ( उत्प्रेक्षा ).
पोहे—पाणपोई.

पृ. १९ ओ. २ या एकाच चरणांत हंसाचे पंख विजेप्रमाणें तेजस्वी, पांढरे व चपळ होते हें ध्वनित केलें आहे. (उपमा)

... ... ३ व ४ हंसाच्या चोंचींच्या व चवड्यांच्या किंचित् लालसर रंगांना माणिकाच्या व दमयन्तीच्या अधराच्या रंगांच्या उपमा दिल्या आहेत.
भीमकन्यका म्हणजे दमयंती.

... ... ८ ( श्लोक ८, ९ व १० यांत सुंदर स्वभावोक्ति आहे ).
पक्षीं तनू लपवि—तो कलहंस आपलें शरीर पंखांत लपवीत होता. पक्ष म्हणजे पंख येथें 'पक्षीं' हें सप्तमीचें रूप आहे.

... ... ९ टाकी उपानह—नलराजानें चाहूल लागूं नये म्हणून पायांतला जोडा काढून टाकला.

... ... १० डौर—सर्व कपड्यांवरून घालावयाचा पायघोळ अंगरखा

... ... ११ हातांतील ( सोन्याचें ) कडें वाजूं नये म्हणून वर सारलें.

... ... १२ राजानें हंसाला पायांच्या ठिकाणीं पकडलें. ( पक्ष्यांचे पंख चपळ असतात. पाय नाजुक असतात. म्हणून नेहमीं त्यांना धरावयाचें झाल्यास त्यांचे पाय पकडतात.)

... ... १५ मणिबंध—मनगट.

... ... १६ ज्याला बळकट धरलें आहे अशा पक्ष्याला म्हणजे हंसाला तो ( नलराजा ) सोडील काय ? अर्थात् नाहीं. पंचू म्हणजे पक्षी. (हिंदींत 'पंछी' असा शब्द आहे.)

... ... १७ त्याच्याशिवाय इतर पक्षी भीतीनें एकएकटे जिकडे वाट फुटेल तिकडे पळाले.

... ... १९ 'जो गवसला त्याजपाशीं तो स्वजन नसे' असा अन्वय. ज्याला प्रतिबंध म्हणजे कैद होते त्याच्यापाशीं त्याचे आप्त फिरकत नाहींत.'

. १९ ओ. २० विपरीत काळ आला म्हणजे आतच काय प
कोणीहि उपयोगी पडत नाहीं; साहाय्य करीत नाहीं
( अर्थांतरन्यास )

. २० ओ. २ हंस नळाला विनवितो:—" ( तूं जर मला सोडू
दिलेस ) तर मी पंख हलवीत हलवीत माझ्य
मुक्कामाकडे जाईन.
पक्षपातें—पंख फडफडवीत.

. ... ३ ते ६ ( व्याजोक्ति )
झुंनार—टढवय्ये. बुद्धि खोटी—निंद्य विचार.

. ... ८ कटक—कंबरपट्टा.

. ... ९ आशा—लालसा, इच्छा.

. ... १३ पाता—पालक, पालनकर्ता.
विधि—ब्रह्मदेव.

. ... १५ ते १८ आपले पळून गेलेले मित्र घरीं पोंचले आणि त्यांनीं
आपल्या अटकेची वार्ता आपल्या पत्नीला सांगितली
म्हणजे तिची मनःस्थिति कशी होईल याची
स्वतःच्या मनाशीं कल्पना करीत आहे.
सखे—मित्र ( अ. व. ); समाचार—वार्ता.

. ... १९ व २० बाळे व वेल्हाळे हे शब्द पत्नीला अनुसरून. वेल्हाळ
म्हणजे सुंदर.
सध्यां लहान असलेलीं मुलें पुढें मोठीं होऊन तुझ्या
कामीं पडतील.

. ... २१ व २२ ( हंसाला पत्नीपेक्षा आपल्या म्हाताऱ्या आईची
काळजी अधिक वाटत आहे.) म्हणून तो म्हणतो;—
"माझी आई कायमचीच शोकशाळेंत जाऊन बसेल.
म्हणजे तिला मरण येईल. माझ्या आठवणींनीं तिच्या
हृदयाला चटके बसतील. "
शोकशाळा—(संस्कृत काव्यांतून शोकागाराचें वर्णन
आहे. पूर्वीं एखाद्यास शोक झाल्यास त्याला घरातील

एका विवक्षित खोलींत बसावें लागे. त्या खोलीला 'शोकशाळा' म्हणत.)

२१ श्लो. ३ व ४ (व्याजोक्ति)

. ... ६ नलावर दयेच्या सागराचें रूपक. हेलावला-उचंबळला.

. ... ७ व ८ नलानें हंसाला सोडलें आणि म्हणाला,— "जा (सरोवरांत) विहार कर. (किंवा आकाशांत) उडून जा. तुझी जशी इच्छा असेल तसा राहा."
यथानिजमनोरथ—मनाच्या इच्छेप्रमाणें.

. ... ९ शालशाखा–शाल नांवाच्या वृक्षाच्या फांदीवर.

. ... १० क्षणभर (त्या हंसानें) आपल्या शरीराच्या ठिकाणीं सुटकेमुळें झालेल्या विश्रांतिसुखाचा अनुभव घेतला.

. ... ११ स्वजन—आप्त, नातलग.
तो सुटला तेव्हां त्याचे आप्त त्याच्याभोंवतीं एकत्रित झाले.

. ... १२ *(आणि) आपल्या बांधवास आलिंगन देऊन रडूं लागले.*
बाष्पबिंदु—अश्रु.

**वामन पंडित (इ. स. १६१८–१६९५):**

वामन पंडित हे मूळचे विजापूरचे, त्यांच्या वडिलांचें नांव नरहरि शेषे. डेतांना फार्शी भाषा अवगत होती असें म्हणतात. ते आयुष्याच्या आरंभीं जापूर दरबारांत नोकरीस होते. एकदां सुलतानानें त्यांना इस्लामाची ा देण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें पंडितांनीं विजापूर सोडलें. तेथून ते शीला गेले. काशीस त्यांनीं संस्कृत भाषेचें आणि वेदान्त विषयाचें अध्ययन लें. यापुढें महाराष्ट्रांत गांवोगांवीं हिंडून त्यांनीं जनतेला आपल्या विद्वत्तेचा ज्ञानाचा लाभ दिला.

पंडितांची कीर्ति निव्वळ विद्वान् म्हणूनच नाहीं. ते मूर्तिपूजक असून वंत भक्त होते. *श्रीकृष्ण* हें त्यांचें आराध्यदैवत होतें. *निगमसार* हा ांचा वेदान्तपर ग्रंथ आहे. यथार्थदीपिका ही त्यांची गीतेवरील टीका आहे. कृष्णाचे उपासक असल्यामुळें त्यांनीं भागवतांतील भिन्न भिन्न प्रसंगांवर

अनेक श्लोकबद्ध आख्यानें लिहिलीं आहेत. त्यांच्या रचनेचें अनुकरण करून महाराष्ट्रांत अनेक आख्यानें प्रसार पावलीं आहेत. त्यामुळें वामन या नांवाचे अनेक कवि झाले असा एक वाद महाराष्ट्रात आहे. परंतु पंडितांचीं आख्यानें त्याच्या गुणांमुळें सहज ओळखूं येतात. तीं सर्वश्रुत आहेत.

पंडिताची वर्णनशैली अनुपम आहे. कवितेंतील प्रसंगाचें स्थूल चित्र मनश्चक्षूंसमोर यथातथ्य उभें करावयाचें हा तिचा विशेष आहे. त्याची रचना नादमधुर असून तिला शब्दालंकारांचा विलक्षण हव्यास आहे. त्यांच्या आख्यानांत योजलेलीं वृत्तें विविध असून तीं प्रसंगानुरूप व भावानुकूल आहेत. 'सुश्लोक वामनाचा' अशी त्याच्या श्लोकरचनेची महाराष्ट्रात प्रसिद्धि आहे.

**१५ बालकृष्णाचा वनविहार :**

हा उतारा वनसुधा या काव्यातील आहे. श्रीकृष्ण व त्याचे सवंगडी वनांत गाई चारतांना कशा क्रीडा करीत त्याचें हें भक्तिभावपूर्ण वर्णन एखाद्या मूकचित्राप्रमाणें आहे. शब्दांच्या रंगामुळें तें उठावदार झालें आहे.

पृ.२२ओ. १ वल्लवाचे बाळ—गवळ्यांचीं मुलें

... ... ४ स्वनायासवें—कृष्णाबरोबर.

... ... ६ तनाना करीतीं—सुरानें गुणगुणत, गाणें गात गात.

... ... ७ विचित्रें मोरपत्रें—निरनिराळे रंग असलेलीं मोरांचीं पिसें

... ... ८ शरीरावर चंदनाच्या उटीनें निरनिराळ्या आकृत्या काढीत होतीं.

... ... ९ ते १२ शिवाशिवीचा खेळ खेळताना जें मूल कृष्णास प्रथम हात लावी त्यास तो मोठेपणा देई. प्रत्येक मूल कृष्णालाच शिवण्यास उत्सुक होतें
पाणी—हात.

... ... १३ परोपरी—अनेक प्रकारें.

... ... १४ आपलीं मनें कृष्णाच्या ठिकाणीं अर्पण करून, म्हणजे कृष्णास सर्वस्व मानून.

... ... १५ ते २० मुलें माकडांशीं माकडचेष्टा करीत होतीं त्याचें हें

पृ.२२ ओ.२१ व २२ गंमत म्हणून जीं मुलें आकाशांत उडणाऱ्या पक्ष्यांच्या सावल्या जमिनीवर उमटत त्यांच्याबरोबर धावण्याचा प्रयत्न करीत.

पृ. २३ ओ. १ व २ तीं मुलें हंसाच्या चालीचें अनुकरण करीत होतीं. हंस, परमहंस हे शब्द योग्याला लावतात. त्यांचा गुरु म्हणजे श्रीकृष्ण. त्यांचें सान्निध्य किंवा सहवास ज्यांना प्राप्त झाला आहे अशीं तीं मुलें.

... ... ३ ते ६ यांत मोराच्या नाचाचें व मुलांनीं केलेल्या त्याच्या अनुकरणाचें वर्णन आहे.

मेघनीळ शब्दावर श्लेष आहे. एकपक्षीं निळा मेघ असा अर्थ. दुसऱ्यापक्षीं श्रीकृष्ण असा अर्थ.

तोक—मुलें. अन्योन्य—एकमेकांना.

तीं मुलें एकमेकांना 'तो पाहा, मोर कसा नाचतो आहे. आपण तसें नाचतों आहोत का!' असें खुणांनीं सुचवीत होतीं.

... ... ७ ते १० डोळे मिटून एका पायावर उभें राहणाऱ्या बगळ्याच्या ध्यानाला ढोंगी गोसाव्याच्या ध्यानाची उपमा दिली आहे. तो ज्याप्रमाणें लोकांपुढें खोट्या ज्ञानाचें व उपदेश देण्याचें प्रदर्शन करतो त्याची तीं मुलें नक्कल करीत होतीं. ती पाहून करुणाकार कृष्णाला हंसूं येत होतें.

... ... १८ कृष्ण हा सामान्य गवळ्याच्या मुलांबरोबर सहभोजन करीत आहे हें पाहून आकाशांतील देवांना आश्चर्य वाटलें.

... ... २३ व २४ कृष्ण मध्यें व भोंवतालीं सारख्या अंतरावर मुलें बसल्यानें कृष्ण सर्वांना दिसत होता. यांत कृष्णास पक्षपात मान्य नव्हता असें ध्वनित केलें आहे.

पृ. २४ ओ. ३ ते ६ कर्णिका—कमळांतील परागाचा दांडा. हा मध्यभागीं असतो. कमळाच्या लहान पाकळ्या आधीं व मग मोठ्या अशी रचना असते. त्याचप्रमाणें कृष्णानें पुढें लहान व त्याच्यामागें मोठीं मुलें असे

ऱ्हस्वदीर्घ—लहान मोठे.

भवार्कातपत्रें—( भव + अर्क + आतप + त्र ) भव (संसार) हाच अर्क (सूर्य), त्याच्या आतपा (ऊन) पासून संरक्षण करणारा म्ह० श्रीकृष्ण—त्यानें.

पृ. २४ ओ. ११ ते १४ हें श्रीकृष्णाच्या वेषाचें वर्णन आहे. वंशी म्हणजे वेणु हीच जशी सुंदर गायन करणारी नृत्यांगना (म्ह० नादनटी) त्यानें आपल्या कमरेवरील शेल्यात पोटा-पाशीं खोंवली होती

पट—शेला.

डाव्या काखेंत वाजवावयाचें शिंग लटकावलें होतें आणि जवळच वेताची सफेद काठी होती.

कक्षे—काखेंत.

झाडाखालीं नदीच्या काठीं (त्याच्या) सावळ्या शरी-राला उटी लावली आहे (असा तो कृष्ण) जेवत होता. (तें दृश्य पाहण्यासाठीं) आकाशात देवानीं दाटी केली होती (आणि) जटाधारी (ऋषीमुनी) व साक्षात् शंकर तो आनंद लुटत होते

धूर्जटी—शंकर.

१६ वेणुवादन

हा उतारा वेणुसुधा या काव्यातला आहे. श्रीकृष्णाच्या वेणुवादनानें वृंदावनां-तील गाईगुरें, पशुपक्षी व गोपगोपी यांना मोह पडून त्याचें देहभान कसें नाहींसें होत असे त्याचें यात वर्णन आहे. यात वामन पंडितानीं काहीं शब्दचित्रें इतकीं उत्तम वठवलीं आहेत कीं, मनाच्या डोळ्यानीं तीं सारखीं पाहात राहावीं असें वाटतें.

पृ. २४ ओ. ५ गोप व गोपांगना हें म्हणत आहेत.

,, ६ व ७ वेणुवादनानें जशीं काहीं चित्रें काढलेलीं असावीं अशीं गाईगुरें दिसतात. वेणूच्या रसाळ आवाजाचा हा प्रभाव होय.

पृ. २५ ओ १ ते ८ यात दूध पुरतेपणीं पिऊन झालें नाहीं तोंच कानांत वेणूचा नाद शिरल्यामुळें वासराची स्थिति कशी होत

अथे तें सांगितलें आहे. यांतरें निजलेलीं आहेत कीं चित्रांत रंगवलेलीं आहेत कांहीं कळत नसे. बहुधा तीं चित्रितच असावींत.

*लिहिलीं*—*चित्रांत काढलेलीं.*

पृ. २५ ओ. १० (वेणुनाद) म्हणजे जणूं मृताला जीवनरस होता.

... ... ११ वृंद—समुदाय. (गाईगुरें व गोपगोपी यांचा.)

... ... १३ अभिराम मल्लवेष—सुंदर गोपवेष.

... ... १६ शतपत्रें—कमळें.

... ... १७ गोधनानें म्हणजे गाईगुरांनीं फार पुढें जाऊं नये (म्हणून). नय जावें—जाऊं नये.

... ... २३ व २४ 'चित्त' नको, 'चित्तिं' हवें.
(एका गोपानें असें आपल्या अनुभवाचें वर्णन केलें कीं,) कृष्णाकडे एकसारखें पाहातच राहावें असें वाटतें. इतकें कीं, तो नेत्रांच्या वाटेनें चित्तांत जातो आणि तेथेंच गुंगून राहतो.

... ... २६ *कृष्ण षट्पद—काळे भुंगे.*

पृ. २६ ओ. २ (भुंगे) कृष्णदर्शनाचा लाभ घेत होते.

... ... ६ देव आणि देवांचे राजे जणूं भुंगे होऊन कृष्णाच्या वनमाळेचें सेवन करीत होते.

... ... ११ ते १४ यांत श्रीकृष्ण व मेघ यांच्यांतील साम्य दाखविलें आहे. दोघेहि रंगानें काळे, परंतु जीवनाचा सुकाळ करणारे. कृष्ण जन्माला घालतो आणि मेघ पाणी देऊन प्राणिमात्रांना जिवंत ठेवतो. तेव्हां ते दोघे मित्र हा आशय. मेघ कृष्णाला भेटण्यास आला.

... ... १८ (श्लोक १२, १३, १४ व १५ मध्यें मेघाचें वर्णन आहे.)
श्रीअजाला—श्रीकृष्णाला.

... ... २० महदतिक्रम–श्रीकृष्णाच्या वेणुनादाहून मेघाची गर्जना विशेष होणें म्हणजे मोठाच अतिक्रम (अपराध) होय.

व्यासंग असल्यामुळें त्याच्या काव्यात असंख्य शब्दालंकार व अर्थालंकार गुंफले गेले आहेत. रसाच्या दृष्टीनेंहि पंताचें काव्य प्रथम प्रतीचें आहे. वीर च वत्सल हे त्याचे आवडते रस आहेत. त्याच्या काव्यात शृंगार आहे. तोहि संयमित व मुग्ध आहे. पंतांचें कथारचनाचातुर्य व कथनकौशल्य निर्विवाद श्रेष्ठ असून स्वभावरेखन मार्मिक आहे.

**१७ रुक्मिणीचें स्वविवाहकथन :**

ही रुक्मिणीविवाहाची कथा कृष्णविजयाच्या त्र्यायशिव्या अध्यायात आली आहे. कौरव व यादव याच्या भार्या एका जागीं जमल्या आहेत आणि एकमेकींना आपल्या विवाहाच्या आठवणी सागत आहेत असा प्रसग आहे. प्रस्तुत रुक्मिणी आपल्या विवाहाचें वृत्त निवेदन करीत आहे. हा प्रेमळ व मनोरम प्रसंग गृहस्थाश्रमाची धन्यता अनुभवणाऱ्या पंतासारख्या प्रतिभासपन्न कवीच्या लेखणींतून निघाला असल्यामुळें तो अतिशय मार्मिक व रसाळ उतरला आहे. रुक्मिणी स्वतःच विवाहवृत्त सागत असल्यामुळें स्त्रीस्वभावाला अनुरूप अशी साधी परंतु सरस वाणी या काव्यात साधली आहे.

| | |
|---|---|
| पृ. २९ श्लो. १ | रुक्मिणी विदर्भ देशची राजकन्या म्हणून वैदर्भी |
| ... ... ४ | हारि—मनोहर; चित्ताकर्षक. |
| ... ... ५ | यात रुक्मिणीचें कृष्णकथाप्रेम व औदार्य दिसतें. |
| ... ... ८ | धरा ...खणी—पायाच्या नखानीं जमीन खणीत बसणें हें चिंतेचें चिन्ह आहे. ( रुक्मिणी चिंतातुर होई. ) |
| ... ... १० | रुक्मिणीचें वय विवाहाला योग्य होत होतें. तेव्हा हिच्या दैवात कोण पति असेल, कारण 'दैव' हें बलवान् आहे असें म्हणणारे लोकच खरोखर भित्रे |

| | |
|---|---|
| पृ.२९ ओ. १३ | स्वगुरुविचारातें—मला कृष्णाला द्यावयाचें हा जो वडीलधाऱ्या मंडळींचा विचार तो. |
| ... ... १४ | चैद्य म्हणजे शिशुपाळ. हा चेदी देशाचा राजा. कृष्णाचा वैरी व रुक्मीचा मित्र होता. |
| ... ... १६ | वडिलधाऱ्यांचें रुक्मीपुढें चालेना तेव्हां रुक्मिणीच्या मनांत आत्महत्येचे विचार येऊं लागले. |
| ... ... १७ | रुक्मिणीनें एका विश्वासू ब्राह्मणाच्या हातीं कृष्णाला गुप्त रीतीनें पत्र पाठविलें तो प्रसंग. |
| ... ... २१ | मूळ संस्कृत काव्यांत ' वसंततिलका ' वृत्त आहे. |
| पृ.३० ओ. २३ | सद्विप्र—सदाचरणी ब्राह्मण. |
| ... ... २४ | प्रणतवत्सलाला म्हणजे शरण आलेल्याला जो ममत्व दाखवतो त्या कृष्णाला शपथ घालून क्षिप्र ( लवकर ) आणण्यासाठीं. |
| ... ... २५ | शाल्व, मगधपति म्हणजे जरासंध व चैद्य म्हणजे शिशुपाळ हे रुक्मीचे मित्र व कृष्णाचे वैरी आले. |
| ... ... २६ | त्यामुळें कुंडिनपुर म्हणजे विदर्भाची राजधानी ही त्यांच्या बळांच्या समुद्रांत बुडून गेली. कारण त्या सर्वांनीं आपआपलीं सैन्यें आणलीं होतीं. आणि ( तीं पाहून ) रुक्मिणीचें मन आधींत ( म्हणजे मानसिक चिंतेंत ) बुडून गेलें. |
| ... ... २८ | खळदर्पघ्न—दुष्टांच्या गर्वाचें हनन करणारा. नतचातकदयासुधाजळद—नम्र चातकाला जो दयारूपी सुधेचा मेघ आहे. ( हीं दोन्ही कृष्णाचीं विशेषणें आहेत. ) |
| ... ... ३० | चिंतातुर मनास ( शरीर ) आधाराची काठी झालें. यष्टी—आधाराची काठी. |
| ... ... ३१ | ( आर्या १६, १७ व १८ मध्यें रुक्मिणीच्या चिंतातुर मनाचे पापुद्रे उलगडले आहेत. ) |
| ... ... ३४ | कोट्यवधि चिंतामणिहि ज्याच्या चरणकमलाच्या धुळीची बरोबरी करूं शकत नाहींत असा कृष्ण. |

पृ.३१ ओ.५१ व ५२ कृष्ण आल्यानें रुक्मिणीच्या हृदयास आनंद झाला. तेव्हां तेथील चिंतेला शिशुपालादिकांच्या मनांनीं आपल्याकडे बोलाविलें.
पालविलें—बोलाविलें.

… … ५३ रुक्मिणी देवीच्या दर्शनाला जाते तो प्रसंग.

… … ५७ दंशित—कवचधारी.
कोले—( जुनें रूप ) आतां कोल्हे.

… … ५८ ओले वरि वीररसें—म्हणजे रुक्मि, शिशुपाल, जरासंध आदि वैर दिखाऊ वीर होते.

… … ५९ श्रीपदपद्में—देवीचें चरणकमल.

… … ६३ यावरून प्राचीन काळीं स्त्रियांना ब्राह्मणी पूजा सांगीत असें दिसतें.
विप्रसती—ब्राह्मणी.

… … ६४ ' फलितं सर्व '—' फलेन फलितं सर्व ' पूजेच्या वेळचा हा मंत्र आहे. म्हणजे ' सर्व फळें प्राप्त होतील. '

… … ६५ देवीप्रासाद—अंबादेवीचें देऊळ.
आलीला—आलेलीला

… … ६६ आलीला धरुनि करीं—सखीला हातीं धरून.
आलीला—किंचित् लीला ( दाखविली ).

… … ७० दावा—वैर.

पृ. ३२ ओ. ७१ लोल— ( औत्सुक्यानें चंचल )

… … ७३ महा भागा—उत्सवास.

… … ७६ शिशिरीं—थंडीच्या दिवसांत.

… … ७७ सुमनोमाळा—पुष्पमाळा हा एक अर्थ; उत्तम मनोरूप माळा हा दुसरा अर्थ ( श्लेष ).

… … ७९ उंचलितां—( कृष्णाच्या गळ्यांत माळ घालण्यासाठीं रुक्मिणीनें हात उंच करतांच. )
प्रिय—श्रीकृष्ण.

… … ८० लव लागेना— एक क्षणहि लागला नाहीं.

… … ८४ काय—( पुल्लिंगी शब्द ) शरीर.

## १ केशवसुत (इ. स. १८६६–१९०५):

केशवसुताचें सबंध नाव कृष्णाजी केशव दामले. त्याचें प्राथमिक शिक्षण रत्नागिरी जिल्ह्यातील खेड या गावीं झालें. पुढें इंग्रजी शिक्षणासाठीं त्याना बडोदें, नागपूर व पुणें अशीं स्थलांतरें करावीं लागलीं. शेवटीं पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमधून ते १८८९ मध्यें प्रवेशपरीक्षा पास झाले. प्रतिकूल परिस्थितीमुळें त्याना कॉलेजचें शिक्षण घेता आलें नाहीं.

अशा रीतीनें शिक्षण थांबल्यावर केशवसुत नोकरींत शिरले. आरंभीं पाच-सहा वर्षें ते मुंबईस राहून मिशनशाळेंत, ज्ञानोदय कचेरींत किंवा कस्टम खात्यात तात्पुरत्या जागावर कामें करीत होते. पुढें ते खानदेशात आधीं मडगावला व नंतर फैजपूरला शिक्षक म्हणून राहिले. अगदीं अखेरीं १९०३ सालीं म्हणजे मृत्यूच्या पूर्वी दोन वर्षें ते धारवाडला सरकारी हायस्कुलात शिक्षक म्हणून लागले. अशा तऱ्हेनें त्याना व्यवसायात शेवटपावेतों कधींच स्थैर्याचा अथवा शांततेचा लाभ झाला नाहीं.

केशवसुताना बालपणापासूनच कविता रचण्याचा नाद होता. इंग्रजी शिक्षण घेत असताना तो वाढीस लागला. संस्कृत किंवा प्राचीन मराठी कवितेपेक्षा इंग्रजी कवितेवर त्याची अधिक भक्ति होती. ती इतकी कीं त्यानीं मराठी कवितेला तिचें वळण लावून त्यात यश संपादन केलें. अशा प्रकारची कविता केशवसुतानींच प्रथम लिहिली व तीहि प्रथम प्रतीची लिहिली, म्हणूनच त्याना आधुनिक मराठी कवितेचे जनक असें संबोधण्यात येत असतें.

केशवसुताच्या कवितेंत दोन प्रकार प्रामुख्यानें आढळतात. त्याच्या काहीं कवितात मनोलेखन आहे आणि काहीं कवितात विचारात्मक चिंतन आहे. त्याच्या ठिकाणीं विलक्षण आत्मपरता होती. त्यामुळें त्याच्या वाणीला ओज चढतें आणि कवितेंत उत्कट स्फूर्तीचा प्रत्यय येतो. त्याची कविता वाचताना ते जणू काहीं आपल्याशीं बोलत आहेत असा भास होतो. त्यामुळें त्याची कविता अंतःकरणाची पकड सहज घेते.

केशवसुतानीं प्रेमावर, देशभक्तीवर, समाजसुधारणेवर, स्त्रीदाक्षिण्यावर निसर्गावर आणि स्वतःच्या सुखदुःखावर कविता लिहिल्या आहेत. या विविधतेमुळें त्या वाचताना तोच तो-पणा जाणवत नाहीं. त्यानीं मराठी काव्यात काहीं

काव्यप्रकार व रचनाप्रकार प्रथमच त्यांनीं आणले. ताजमहाल आणि मयूरसिंहासन ही कविता लिहून त्यांनीं इंग्रजींतील सॉनेट ( Sonnet ) हा काव्यप्रकार व रचनाप्रकार मराठींत रूढ केला. आपल्या हृदयंगम भावगीतांमुळें, नाविन्यपूर्ण चिंतनिकांमुळें आणि छंदांच्या नवनिर्माणामुळें ते मराठी कवितेच्या क्षेत्रांत युगप्रवर्तक मानले जातात.

१८ सृष्टि, तत्त्व आणि दिव्यदृष्टि :

या कवितेंत केशवसुतांनीं एक विचार प्रकट केला आहे. तो काव्यदृष्टी-विषयींचा आहे. सामान्यांची दृष्टि आणि कवीची म्हणजे कलाकाराची दृष्टि यांतलें अंतर तींत व्यक्त झालें आहे. सामान्यांच्या दृष्टीला सृष्टींतील जी वस्तु अगदींच अनुपयुक्त वाटते, तिच्यांतच कलाकाराच्या दृष्टीला सौंदर्याचा साक्षात्कार होतो.

पृ. ३२ ओ. २ मधुर...लागलीं–फुलें वाऱ्यावर सुवास सोडूं लागलीं.

... ... ३ प्रावारुन–परिधान करून, नेसून. ( कारण प्रावार म्हणजे अंगवस्त्र )

तुषारांचें म्हणजे ( इथें ) दंवांचें वस्त्र परिधान करून उषा सूर्याची वाट पाहात होती. ( अजून सूर्योदय झाला नव्हता. )

... ... ४ मोहून–त्या सुंदर देखाव्यानें भुरळ पडून.

... ... ५ ' पश्यात्रास्मि '–( पश्य + अत्र + अस्मि ' मी येथें आहें ' ) असें एक गंभीर ध्वनि म्हणाला.

... ... ६ ' भो ! कुत्रासि ! ( ' अरे ! कुठें आहेस ! ) असें कवीनें विचारलें.

' कुत्राप्यस्मि च सर्ववस्तुषु '—( कुठेंहि आहे. सर्व वस्तूंत आहे ) असें उत्तर मिळालें.

इथें एकदां ' आणि ' आल्यावर पुन्हां ' च ' ची गरज नव्हती. हा दोष आहे. )

केशवसुतांनीं या तिन्ही ओळींत संस्कृत भाषा मुद्दाम योजिली आहे. कारण तिच्यामुळें जणूं कांहीं असा प्रसंग प्रत्यक्षच घडला असावा असा आभास उत्पन्न होतो. हा आपल्या मनावरला संस्कार आहे.

## १ केशवसुत (इ. स. १८६६–१९०५):

केशवसुताचें सबध नाव कृष्णाजी केशव दामले. त्याचें प्राथमिक शिक्षण रत्नागिरी जिल्ह्यातील खेड या गावीं झालें. पुढें इंग्रजी शिक्षणासाठीं त्याना बडोदें, नागपूर व पुणें अशीं स्थलांतरें करावीं लागलीं. शेवटीं पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमधून ते १८८९ मध्यें प्रवेशपरीक्षा पास झाले. प्रतिकूल परिस्थितीमुळें त्याना कॉलेजचें शिक्षण घेता आलें नाहीं.

अशा रीतीनें शिक्षण थांबल्यावर केशवसुत नोकरींत शिरले. आरंभीं पाच-सहा वर्षे ते मुबईस राहून मिशनशाळेंत, ज्ञानोदय कचेरींत किंवा कस्टम खात्यात तात्पुरत्या जागावर कामें करीत होते. पुढें ते खानदेशात आधीं भडगावला व नंतर फैजपूरला शिक्षक म्हणून राहिले. अगदीं अखेरीं १९०३ सालीं म्हणजे मृत्यूच्या पूर्वी दोन वर्षे ते धारवाडला सरकारी हायस्कुलात शिक्षक म्हणून लागले. अशा तऱ्हेनें त्याना व्यवसायात शेवटपावेतों कधींच स्थैर्याचा अथवा शांततेचा लाभ झाला नाहीं.

केशवसुताना बालपणापासूनच कविता रचण्याचा नाद होता. इग्रजी शिक्षण घेत असताना तो वाढीस लागला. सस्कृत किंवा प्राचीन मराठी कवितेपेक्षा इग्रजी कवितेवर त्याची अधिक भक्ति होती. ती इतकी कीं त्यानीं मराठी कवितेला तिचें वळण लावून त्यात यश सपादन केलें. अशा प्रकारची कविता केशवसुतानींच प्रथम लाहिली व तीहि प्रथम प्रतीची लिहिली, म्हणूनच त्याना आधुनिक मराठी कवितेचे जनक असें संबोधण्यात येत असतें.

केशवसुताच्या कवितेंत दोन प्रकार प्रामुख्यानें आढळतात. त्याच्या काहीं कवितात मनोलेखन आहे आणि काहीं कवितात विचारात्मक चिंतन आहे. त्याच्या ठिकाणीं विलक्षण आत्मपरता होती. त्यामुळें त्याच्या वाणीला ओज चढतें आणि कवितेंत उत्कट स्फूर्तीचा प्रत्यय येतो. त्याची कविता वाचताना ते जणूं काहीं आपल्याशीं बोलत आहेत असा भास होतो. त्यामुळें त्याची कविता अंत:करणाची पकड सहज घेते.

केशवसुतानीं प्रेमावर, देशभक्तीवर, समाजसुधारणेवर, स्त्रीदाक्षिण्यावर निसर्गावर आणि स्वत.च्या सुखदु:खावर कविता लिहिल्या आहेत.या विविधतेमुळें त्या वाचताना तोच तो-पणा जाणवत नाहीं. त्यानीं मराठी काव्यात काई

काव्यप्रकार व रचनाप्रकार प्रथमच नव्यांनीं आणले. ताजमहाल आणि मयूरसिंहासन ही कविता लिहून त्यांनीं इंग्रजींतील सॉनेट ( Sonnet ) हा काव्यप्रकार व रचनाप्रकार मराठींत रूढ केला. आपल्या हृदयंगम भावगीतांमुळें, नाविन्यपूर्ण चिंतनिकांमुळें आणि छंदांच्या नवनिर्माणामुळें ते मराठी कवितेच्या क्षेत्रांत युगप्रवर्तक मानले जातात.

**१८ सृष्टि, तत्त्व आणि दिव्यदृष्टि :**

या कवितेंत केशवसुतांनीं एक विचार प्रकट केला आहे. तो काव्यदृष्टी-विषयींचा आहे. सामान्यांची दृष्टि आणि कवीची म्हणजे कलाकाराची दृष्टि यांतलें अंतर तींत व्यक्त झालें आहे. सामान्यांच्या दृष्टीला सृष्टींतील जी वस्तु अगदींच अनुपयुक्त वाटते, तिच्यांतच कलाकाराच्या दृष्टीला सौंदर्याचा साक्षात्कार होतो.

पृ. ३३ ओ. २ मधुर...लागलीं–फुलें वाऱ्यावर सुवास सोडूं लागलीं.

... ... ३ प्रावरुन–परिधान करून, नेसून. ( कारण प्रावार म्हणजे अंगवस्त्र )
तुषारांचें म्हणजे ( इथें ) दंवांचें वस्त्र परिधान करून उषा सूर्याची वाट पाहात होती. ( अजून सूर्योदय झाला नव्हता. )

... ... ४ मोहून–त्या सुंदर देखाव्यानें भुरळ पडून.

... ... ५ ' पश्यात्रास्मि '–( पश्य + अत्र + अस्मि ' मी येथें आहें ' ) असें एक गंभीर ध्वनि म्हणाला.

... ... ६ ' भो ! कुत्रासि ! ( ' अरे ! कुठें आहेस ! ) असें कवीनें विचारलें.

... ... ७ ' कुत्राप्यस्मि च सर्ववस्तुषु '—( कुठेंहि आहे. सर्व वस्तूंत आहे ) असें उत्तर मिळालें.
इथें एकदां ' आणि ' आल्यावर पुन्हां ' च ' ची गरज नव्हती. हा दोष आहे. )
केशवसुतांनीं या तिन्ही ओळींत संस्कृत भाषा मुद्दाम योजिली आहे. कारण तिच्यामुळें जणूं कांहीं असा प्रसंग प्रत्यक्षच घडला असावा असा आभास उत्पन्न होतो. हा आपल्या मनावरला संस्कार आहे.

मासंपन्न कवीनें त्या दृश्यांतूनहि विशाल आशय काढला. रांगोळीच्या कात्मक आकृत्यांत त्यांना चंद्र, सूर्य, स्वर्ग इत्यादिकांचें दर्शन घडलें.

२८ ओ. १ ते ४ लिहिले—काढले, रेखाटले.

(रवि, शशी, नक्षत्रें, गोष्पद, पद्में, बिल्वदलें, चक्रें आदि आकृत्या रांगोळीनें काढत असतात.)

... ... ५ ते ८ कवि शुचिर्भूत घुळांत वाढलेला असल्यामुळें या दृश्याचा त्याच्या मनावर अनुकूल परिणाम झाला. त्याला एक प्रकारची शांतता वाटली. आणि तीर्थक्षेत्रें, देव, ऋषीमुनी, पतिव्रता व पुण्यश्लोक राजे यांचा चित्रपट त्याच्या मनश्चक्षूंपुढून निसटला. हा संस्काराचा प्रभाव होय.

... ... ९ रुचिर—सुंदर.

... ... ११ लीलेनें—अगदीं सहज.

... ... १३ आर्ये !—पवित्र स्त्रिये !

... ... १५ व १६ रांगोळींत सूर्य, चंद्र इत्यादि काढून त्या मुलीनें जणूं कांहीं थोड्या वेळांत स्वर्ग व पृथ्वी यांचा संगम घडवून आणला होता.

... ... १८ धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ होत.

... ... १९ सारसें—कमळें.

(रांगोळींतील निरनिराळ्या आकृत्या दिव्यत्व, साकल्य, पावित्र्य, सौंदर्य, प्रेम आणि ईश्वराचें वात्सल्य सूचित करीत होत्या.)

... ... २१ अये !—अगे !

तुझ्या या स्वर्गीं—रांगोळींत.

... ... २२ आर्ये...स्वयें—हे पवित्र स्त्रिये !

(या रांगोळींत प्रकट झालेल्या उदात्त) तत्त्वांची तूं स्वतः जणूं कांहीं सेविकाच आहे.

उपचारिका—सेविका, पूजिका.

पृ. ४३ ओ. १५ वारांशि–समुद्र (अरबी समुद्र किंवा सिंधुसागर.)

... ... १७ व १८ जें ज्ञानापलीकडील आहे त्यावर जसा क्षणभर अस्तित्वाचा आभास होतो त्याप्रमाणेंच समुद्रावरलें हें लाटांचें नाचणें आहे.

... ... १९ *अब्धि*––समुद्र.

वारिस्थ देवीगण––समुद्राखालीं, पाण्यांत जलदेवता असतात अशी लोकांची एक कल्पना आहे.

... ... २२ चिर सुषुप्ति–(म्ह०) कायमची झोप. अर्थात् मरण. (कवीला अशा कल्पनासुखाचा अनुभव घेत असतांना येणारें मरण प्रिय आहे.)

... ... २३ प्रीती.......असे––माया व ममता या फुलांसारख्या सुंदर व नाजुक असल्या तरी कांटेरी वेलीप्रमाणें आहेत. कारण मायाळू माणसांना प्रियजनांचा विरह सोसावा लागतो.

... ... २४ शूलारोपणयूप...दिसे––मनुष्यांना जगांत आपल्या यशाची पताका फडकत राहावी असें वाटतें खरें; परंतु कवीच्या मतानुसार ती पताका सुळावरली आहे. ती सहजासहजीं व सरळपणें मिळत नाहीं. शूल + आरोपण + यूप (हा समास अर्थपूर्ण नाहीं. शूल म्हणजे सुळी. आरोपण म्हणजे स्थापन व यूप म्हणजे यज्ञस्तंभ) कवीला सुळीच्या खांबावर कीर्तीची

पृ. ४२ ओ. ७ जगदुद्धरा नदी—हिचें खरें नाव ' जगबुडी ' आहे. कवींनीं त्या नावाचें उदात्तीकरण केलें आहे.

... ... ८ (येथून पुढें श्लोक १०, ११, १२, १३ व १४ यात कवीला आपल्या आईवडिलाची, आजोबाची म्हणजे आईच्या वडिलाची व वडील बंधूची आठवण झाली असून आपण त्याना हातभार लावू शकत नाहीं याबद्दल त्याला वाईट वाटत आहे. श्लोक १५, १६ व १७ यात पत्नीची स्मृति आहे.)

... ... ११ व १२ मी लहानच राहिलों असतों तर आईच्या प्रेमळ दृष्टींत स्वर्गसुखाचा साक्षात्कार घडला असता; आणि वडिलाच्या ममताळू मांडीसमोर मी जगाच्या राज्याच्या सिंहासनाला तुच्छ लेखलें असतें.

... ... १३ हा हत ! हा नष्ट !—कवीनें या उद्‌गारानीं स्वतःचा अभागी म्हणून धिक्कार केला आहे.

... ... २० शैशवीं—शिशुपणात, लहानपणीं.

... ... २१ ममताप्रसाद—मायेचा खाऊ; आजोळ—आईचें माहेर.

... ... २२ मातामह—आईचे वडील.

पृ. ४३ ओ. ३ ते १४ नैर्ऋत्येकडला वारा वाहत येऊन कवीस स्पर्श करतो. त्याच्यात कवीपासून दूर कोंकणात असलेल्या पत्नीचे श्वास व अश्रु मिसळलेले असतात. तेव्हा जणूं कांहीं तिनें श्वासानीं प्रेमपत्रें लिहिलीं आहेत व त्यात अश्रूची विरामचिन्हें आहेत अशी कल्पना.

डोळे झाकून वाचणें—(म्हणजे) मनश्चक्षूनीं वाचणें, मनात अनुभवणें.

समूढ मी होतसें—गप्प होतों; आनंद व आश्चर्य यानीं अवाक् होतों.

पत्नीचें भाषण, चुंबन इत्यादि क्रिया कवि मनानें अनुभवीत आहे. त्या सुखी स्वप्नस्थितींत कवीचा वेळ सहज निघून जातो. त्या सुखापुढें त्याला सारें जग तृणवत् वाटतें.

| | |
|---|---|
| पृ. ४३ ओ. १५ | वारांशि–समुद्र (अरबी समुद्र किंवा सिंधुसागर.) |
| ... ... १७ व १८ | जें ज्ञानापलीकडील आहे त्यावर जसा क्षणभर अस्तित्वाचा आभास होतो त्याप्रमाणेंच समुद्रावरलें हें लाटांचें नाचणें आहे. |
| ... ... १९ | अब्धि—समुद्र.<br>वारिस्थ देवीगण—समुद्राखालीं पाण्यांत जलदेवता असतात अशी लोकांची एक कल्पना आहे. |
| ... ... २२ | चिर सुषुप्ति–(स्त्री०) कायमची झोप. अर्थात् मरण. (कवीला अशा कल्पनासुखाचा अनुभव घेत असतांना येणारें मरण प्रिय आहे.) |
| ... ... २३ | प्रीती.......असे—माया व ममता या फुलांसारख्या सुंदर व नाजुक असल्या तरी कांटेरी वेलीप्रमाणें आहेत. कारण मायाळू माणसांना प्रियजनांचा विरह सोसावा लागतो. |
| ... ... २४ | शूलारोपणयूप...दिसे—मनुष्यांना जगांत आपल्या यशाची पताका फडकत राहावी असें वाटतें खरें; परंतु कवीच्या मतानुसार ती पताका सुळावरली आहे. ती सहजासहजीं व सरळपणें मिळत नाहीं.<br>शूल + आरोपण + यूप (हा समास अर्थपूर्ण नाहीं. शूल म्हणजे सुळी. आरोपण म्हणजे स्थापन व यूप म्हणजे यज्ञस्तंभ) कवीला सुळीच्या खांबावर कीर्तीची पताका फडकत असते असें म्हणावयाचें आहे.<br>प्रेमाला विरहाचा त्रास आहे, आणि कीर्ति मिळवायाचा मार्ग सरळ नाहीं, असा आशय. |
| पृ. ४४ ओ. १ व २ | म्हणून कवीला प्रेम व यश यांच्या आनंदाचा उपभोग नको आहे. त्याला एकंदर मनुष्यजीवन ही एक शोकांतिका वाटते.<br>शोकसंकुल नाटक–शोकांतिका (Tragedy). |
| ... ... ४ ते ६ | किरकिऱ्या व अशक्त मुलास अफू देऊन गाढ निजवतात. कविहि येथें विरह व जगांतलें कपट यांविरुद्ध |

हुरहुरत आहे. त्याला दीर्घनिद्रा म्हणजे मृत्यु हव
आहे. तो प्राप्त झाला म्हणजे त्याला पुन्हा विरहदुःख
अनुभवावें लागणार नाहीं.

## १० भा. रा. तांबे ( १८७४–१९४१ ) :

पहिल्या बाजीराव पेशव्यानीं माळवा व बुंदेलखंड काबीज केल्यावर महाराष्ट्रांतून जीं घराणीं उत्तरेकडे जाऊन तिथेंच स्थायिक झालीं त्यापैकींच ताम्ब्यांचें एक घराणें होय. ताम्ब्यांचें प्राथमिक शिक्षण थोडें मराठींतून व थोडें हिंदींतून ग्वाल्हेरजवळील मुगावली या खेड्यांत झालें. पुढे हायस्कूलचें उच्च शिक्षण उज्जयिनी व देवास येथें पार पडलें. इ. स. १८९३ मध्यें अलाहाबाद विद्यापीठाची प्रवेशपरीक्षा प्रथम श्रेणींत उत्तीर्ण होऊन देखील प्रतिकूल परिस्थितीमुळें ताम्ब्यांना महाविद्यालयीन शिक्षणाचा लाभ मिळाला नाहीं. बालपणापासूनच काव्य हा त्यांचा आवडता विषय होता. तेव्हा विद्यालयीन शिक्षणाची उणीव त्यांनीं घरींच खासगी रीतीनें संस्कृत साहित्य व इंग्रजी वाङ्मय यांच्या दीर्घ व मार्मिक परिशीलनानें भरून काढली. ताम्ब्यांना काव्य-स्फूर्तीबरोबरच जी रसोद्ग्राही आलोचनाची दृष्टि प्राप्त झाली होती, तिचें मूळ त्यांच्या या विद्याव्यासंगात आहे.

१८९४ मध्यें ताम्ब्यांना देवासचे राजकुमार खासेराव पवार यांचे शिक्षक नेमण्यात आलें. ते इंदूरच्या डेली कॉलेजचे विद्यार्थी असतांना तांबे त्यांचे पालक होते. या संधीचा ताम्ब्यांनीं चांगला उपयोग केला. त्यांनीं कॉलेजच्या लायब्ररींतले आलोचनात्मक इंग्रजी ग्रंथ अभ्यासिले, आणि जुनें, संस्कृत साहित्यशास्त्र व नवें इंग्रजी टीकाशास्त्र यांचा मिलाफ करून एक नवें व निराळें वळण आपल्या कवितेला लाविलें.

१९०९ ते १९२० या कालखंडात ताम्ब्यांना गुदरखेडा, पिप्लोदा व प्रतापगढ या संस्थानांत निरनिराळ्या अधिकाराच्या हुद्द्यावर कामें करावीं लागलीं. नंतर १९२१ ते १९२३ ते अजमेरास मेयो कॉलेजांत ग्वाल्हेर संस्थानांतील राजपुत्रांचे शिक्षक व पालक होते. पुढें कांहीं दिवस ते शिवपूर, बडोदा येथें अधिकारी होते. नंतर आयुष्याच्या अखेरपर्यंत ते ग्वाल्हेर येथें शिक्षणखात्यात रजिस्ट्रार ऑफ एक्झॅमिनेशन्स या पदावर होते.

ताम्ब्यांचें जीवन उत्तरेकडील हिंदी मुलुखात व संस्थानी वातावरणात गेल्यामुळें

त्यांच्या वाणीवर व लेखणीवर त्या ठिकाणचे संस्कार झाले आहेत. त्यांना संस्कृत, मराठी व इंग्रजी या भाषांप्रमाणेंच हिंदी व उर्दू या भाषा अवगत होत्या. त्यांतील प्रसिद्ध कवींच्या काव्यांचाहि त्यांनीं परामर्ष घेतला होता. या सर्व परिस्थितीचा परिपाक त्यांच्या काव्यांत उतरला आहे.

तांबे कलावादी कवि होते. काव्य व तत्त्वज्ञान यांचें अंतिम ध्येय एकच असलें, तरी मार्ग भिन्न आहेत असें त्यांचें मत होतें. काव्यांत संश्लेषण असतें तर तत्त्वज्ञानांत विश्लेषण असतें असें म्हणत. म्हणूनच त्यांनीं निव्वळ सात्त्विक अशी कविता लिहिलेली नाहीं.

तांब्यांनीं मराठी कवितेला नाट्यगीत हा प्रकार दिला. भावना ही भाषेपेक्षां स्वरांनीं अधिक व्यक्त होते हें प्रथम तांब्यांनीच ओळखलें आणि त्यांनीं कवितेला रागरागिणीची जोड दिली. त्यांची कविता गेय असल्यामुळें 'भावगीत' या संज्ञेस खचित प्राप्त आहे. तांब्यांची कविता पूर्णतया कलात्मक आहे. तिच्यांत चित्राचे रंग आहेत, संगीताचे सूर आणि शब्दांतलें काव्य आहे.

मानव हा काव्याचा उपभोक्ता. तेव्हां तांब्यांनीं त्याच्या भावनांनाच आवाहन केलें आहे. त्या उठून दिसाव्यात म्हणून त्यांनीं निसर्गाचा तात्पुरता उपयोग केला आहे. केशवसुतांप्रमाणें तांब्यांकडेहि दुसऱ्या एका युगाच्या प्रवर्तनाचा मान जातो.

## २४ भयचकित नमावें तुज रमणी !

हें गीत स्त्रीदाक्षिण्यावरील आहे. यांत एकंदर स्त्रीजातीच्या महतीचें स्तोत्र गाइलें आहे. स्त्रियांचा अधिकार, मान व महत्त्व लक्षांत न घेतां पुरुषवर्ग त्यांच्यावर जो अन्याय व अत्याचार करतो, तो ध्यानांत घेऊन तांब्यांनीं हें गीत रचलें आहे. यांत कवींचा स्त्रीजातीविषयींचा आदर व अभिमान व्यक्त झाला आहे.

पृ. ४५ श्लो. १ भयचकित नमावें—भय, आश्चर्य व आदर या संमिश्र भावनांनीं.

... ... २ जन—( येथें ) पुरुषजात.
कसें...चरणीं—तुझ्यावर जुलूम करतें.

... ... ३ ते ५ या निरनिराळ्या नामवंत पुरुषांना स्त्रीच जन्म देते.

... ... ५ स्थितप्रज्ञ...कौंडिती—ईश्वराला आपल्या अंतःकरणांत साठवून ठेवणारे दृढनिश्चयी निष्ठावंत.

पृ. ४६ ओ. ५ फूल—( येथें ) गुलाब अभिप्रेत आहे.

... ... ६ रसरसे—प्रज्वलित दिसतें.

... ... ७ तीव्र.. ... हसते—कठोर बर्फातहि वनवेली व वनस्पती उगवतात.

... ... ८ रे ! उघड...दुरी—डोळे मिटून स्वतःस दुःखांत गुरफटून घेऊं नकोस. नीट पाहा म्हणजे तुला जगांतील आनंद व आशा यांचें दर्शन होईल आणि तुझें दुःख दूर पळून जाईल.

... ... १३ ते १६ मना,......उरीं—येथें मरणावर कवीनें तीन कल्पना केल्या आहेत. तें सुखाचें द्वार आहे, तें मायाळू आई आहे आणि तें म्हणजे ईश्वराची करुणा आहे. ते तुला उराशीं आवळण्यासाठीं वाट पाहात आहे. ( तरी तूं भिऊं नकोस. त्याला आनंदानें भेट. कारण निराशेनंतरच आशेचा उदय होत असतो. )

## २६ मरणांत खरोखर जग जगतें !

या गीतांत आत्म्याच्या अमृतत्वाची कल्पना काव्यमय केली आहे, आणि त्याला स्वातंत्र्याच्या लढ्याची जोड दिली आहे.

पृ. ४६ ओ. ४ स्वातंत्र्याची—( म्ह० ) मुक्तीची; भावी मरणा—( म्ह० ) आजचें मरण उद्यांचें मरण नाहींसें करून तुला अमर करील.

पृ. ४७ ओ. १ व ३ सर्वस्वदान आणि सर्वस्वयज्ञ–( म्हणजे ) संपूर्ण त्याग ( Sacrifice )

... ... ४ रे......पडतें—इहलोकांतील मोहांचें बंधन.

... ... ५ ते ८ स्वातंत्र्यप्राप्तीचा किंवा मुक्ति मिळविण्याचा केवळ यज्ञ म्हणजे त्याग हाच एकमेव मार्ग आहे. त्यावांचून विसावा शक्य नाहीं हा आशय.

... ... ९ व ११ सीतादेवी व बलिराजा यांनीं प्राणयज्ञ केलेल्या पुराणकथांचा उदाहरणादाखल निर्देश.

पृ. ४५ ओ. ६ प्रसव—खाण.

(चरण १, ६, ९ व १४ यात अनुक्रमें रमणी, जननी, मुली व भागिनी हे शब्द साभिप्राय योजून कवीनें स्त्रीच्या भिन्नभिन्न भूमिकाचा निर्देश केला आहे.)

... ... ७ भूत—(म्हणजे) भूतकाळ, गतकाळ.

... ... ९ व १० भविष्य.. मनीं—आजच्या मुली या उद्याच्या माता आहेत ही सूचना.

... ... ११ ते १३ चंद्र, फूल व रत्न या सुंदर, कोमल व उज्ज्वल वस्तु स्त्रियांचीं प्रतीकें आहेत म्हणून सूचना.

... ... १४ 'ही' नको. 'हीं' हवें. म्हणजे हीं प्रतीकें साधनें असा अर्थ.

## २५ घनतमीं शुक्र बघ राज्य करी :

या गीतात ताम्बेंच्या आशावाद मूर्तिमान् झाला आहे. मनुष्य कोत्या दृष्टीचा असतो. तो फक्त स्वत:पुरतें पाहतो, आणि आपल्या लहानसहान दु:खाचा नसता बाऊ करतो. त्यामुळें त्याची निराशा होते. त्यानें जर आपली दृष्टि विशाल केली, आणि जगाकडे पाहिलें, तर त्याला आशा व आनंद याचा लाभ निश्चित होईल. हेंच तत्त्व या गीतात कवीनें काव्यमय केलें आहे.

पृ. ४५ ओ. १ व २ गहद अंधारात तेजानें चकाकणाऱ्या शुक्राकडे पाहून कवीनें निराश मनाला आशावादी बनण्यास उत्तेजन दिलें आहे.

... ... ३ ते ६ ये बाहेरी.. . वरी—येथें कोत्या व निराश मनावर पिलाचें रूपक केलें आहे. त्याला ज्याप्रमाणें आपलें अंडें तेवढेंच जग वाटतें, त्याचप्रमाणें स्वत:च्या दु:खापुरताच विचार करणाऱ्या मनुष्याच्या मनाचा स्थिति असते.

पृ. ४६ ओ. २ 'अनंतकिरणा' (एक शब्द आहे)—सूर्य.

... ... ३ पहा . ...करणा—अरे निराश मना! नीट पाहा. जग सर्व दयेमायेनें पूर्ण भरलेलें आहे.

... ... ४ बागुल रचणें—अकारण स्वत:च्या दु:खाचा मोठा बाऊ करणें.

घरीं–(म्हणजे) घरात एकटेंच कुढत बसून असा अर्थ.

पृ. ४६ ओ. ५ फूल—( येथें ) गुलाब अभिप्रेत आहे.

... ... ६ रसरसे—प्रज्वलित दिसतें.

... ... ७ तीव्र.. ... हस्ते—कठोर मर्मांतहि वनवेली व वनस्पती उगवतात.

... ... ८ रे! उघड...दुरी—डोळे मिटून स्वतःस दुःखांत गुरफटून घेऊं नकोस. नीट पाहा म्हणजे तुला जगांतील आनंद व आशा यांचें दर्शन होईल आणि तुझें दुःख दूर पळून जाईल.

... ... १३ ते १६ मना,......उरीं–येथें मरणावर कवीनें तीन कल्पना केल्या आहेत. तें सुखाचें द्वार आहे, तें मायाळू आई आहे आणि तें म्हणजे ईश्वराची करुणा आहे. ते तुला उरार्शी आवळण्यासाठीं वाट पाहात आहे. ( तरी तूं भिऊं नकोस. त्याला आनंदानें भेट. कारण निराशेनंतरच आशेचा उदय होत असतो. )

## २६ मरणांत खरोखर जग जगतें !

या गीतांत आत्म्याच्या अमृतत्वाची कल्पना काव्यमय केली आहे, आणि त्याला स्वातंत्र्याच्या लढ्याची जोड दिली आहे.

पृ. ४६ ओ. ४ स्वातंत्र्याची—( म्ह० ) मुक्तीची; भावी मरणा—( म्ह० ) आजचें मरण उद्यांचें मरण नाहींसें करून तुला अमर करील.

पृ. ४७ ओ. १ व ३ सर्वस्वदान आणि सर्वस्वयज्ञ–( म्हणजे ) संपूर्ण त्याग ( Sacrifice )

... ... ४ रे......पडतें—इहलोकांतील मोहांचें बंधन.

... ... ५ ते ८ स्वातंत्र्यप्राप्तीचा किंवा मुक्ति मिळविण्याचा केवळ यज्ञ म्हणजे त्याग हाच एकमेव मार्ग आहे. त्यावांचून विसावा शक्य नाहीं हा आशय.

... ... ९ व ११ सीतादेवी व बलिराजा यांनीं प्राणयज्ञ केलेल्या पुराणकथांचा उदाहरणादाखल निर्देश.

| | |
|---|---|
| पृ. ४७ ओ. १६ | रे ! स्वभाव......भल्तें–हा सृष्टिनियम आहे. याविरुद्ध जें आहे तें विपरीत व अहितकारक होय. |
| ... ... १७ | प्रकृतिगती—सृष्टिनियम.. |
| ... .. १८ | कार्पण्य—प्राणाचा त्याग करण्याबाबतची कंजुषी व कुचराई. |
| ... ... १९ | 'जय हर !'–हरहर महादेव हा रणघोष : 'जय हर' चेंच 'जोहार' हें रूप आहे. मातेस्तव–हिंदमातेकरिता. |
| .. ... २० | कृति व त्याग न करता केवळ सभासमेलनातून वावदूकता केल्यानें स्वातन्त्र्यप्राप्ति होईल का ? अर्थात् नाही. |

२७ झांशीवाली :

ग्वाल्हेरला ज्या ठिकाणीं १८५७ च्या स्वातंत्र्यसमरात पराक्रम करणाऱ्या महाराणी लक्ष्मीबाईचें देहावसान झालें त्या ठिकाणीं बांधलेल्या चौथऱ्यावर ही ऊर्जस्वल कविता कोरलेली आहे.

| | |
|---|---|
| पृ. ४८ ओ. १ व २ | तांबे हें लक्ष्मीबाईच्या माहेरचें आडनाव आणि नेवाळकर हें सासरचें आडनाव. |
| ... ... ३ | येथें ' जळती ' म्हणजे उज्ज्वल, तेजस्वी. |
| ... ... ४ | मर्दानी—पराक्रमी. |
| | मूर्त महाकाली—चामुंडेचा मूर्त अवतारच ! रणचंडी. |
| ... ... ५ | खदा घोडा—उमदा व पटाईत घोडा. |
| ... ... ८ | गोऱ्यांची कोंडी—ब्रिटिश सोल्जरांनीं घातलेला वेढा. |
| | वीर पाडीत—(म्ह०) शत्रुसेनेंतील शूरांना ठार करीत. |
| .. ... ९ | कडकडा..... बिजली–तेजस्वी वीज ज्याप्रमाणें क्षण-मात्र कडकडून आगीचा लोळ उतरावा व लुप्त व्हावी त्याचप्रमाणें पराक्रम करून राणी दिवंगत झाली. |
| ... ... १२ | ती..... झाली—कारण १८५७ च्या स्वातंत्र्य-समरानंतर भारतात युद्ध झालेंच नाहीं. |
| | इतिश्री—शेवट, अंत. |
| ... ... १३ | शाहीर—पराक्रमाचे पोवाडे गाणारे कवि. |

२८ एक आकांक्षा :

तांब्यांनीं अखेरच्या दिवसांत लिहिलेलें हें एक सार्थच परंतु करुणरम्य गीत आहे. कवि एका संध्याकाळीं एक रंगीबेरंगी मेघखंड क्षितिजावरून आकाशांत चढतांना अवलोकन करतो. त्याच्या दर्शनानें कवीच्या मनांत पुढील कल्पना येते. ती कवीच्या वयास स्वाभाविक व अनुरूप अशीच होती.

पृ. ४८ ओ. १ मेघशकल—मेघखंड.

... ... २ नीलजलीं—( म्ह० ) आकाशांत ( उत्प्रेक्षा ).

... ... ३ सुनेरी ( हिंदी रूप )—सोनेरी.

... ... ७ पुण्यवान—भाग्यवान, सदाचारी.

... ... ८ अपुल्या—घरीं—( म्ह० ) स्वर्गास, वैकुंठास.

पृ. ४९ ओ. १ ते ३ ही कल्पना आपल्या संस्कृतीला जुळेल अशी आहे. पुण्यवंत सुखानें संसार करतात आणि मग समाधानानें देहाचा त्याग करतात. त्यांनाच स्वर्ग प्राप्त होतो.
तर्पूनि गात्रां—शरीराचा त्याग करून.

... ... ६ हृदय......झालें !—अंतःकरण दुःखी व कष्टी झालें, वाईट वाटलें.

२९ मावळत्या सूर्याप्रत :

कविवर्य भास्करानें मावळत्या सूर्यास लक्ष्य करून लिहिलेली ही एक अन्योक्ति आहे. अधिकारावर असतांना एखाद्या व्यक्तीचा मानसन्मान करावयाचा. परंतु ती तेथून निवृत्त होतांच तिच्याकडे पाहावयाचें देखील नाहीं हा जो मनुष्यस्वभाव त्याचा येथें कवीनें काव्यमय स्फोट केला आहे.

पृ. ४९ ओ. १ सूर्याची उपासना करतांना प्रातः व सायंसंध्यासमयीं त्यास ' अर्घ्य ' म्हणजे उदकांजलि अर्पण करीत असतात.

... ... ५ ' स्वार्थपरायणपरा ' हें ४ थ्या ओळींतील ' रीत ' चें विशेषण. तात्पर्य, जग हें स्वार्थी आहे. हा त्याचा स्वभावच आहे.

... ... ७ ' असतिल शितें तर जमतील् भुतें ' ही म्हण. म्हणजे खाण्याचा सुकाळ असला कीं भोंवतालीं सारे जमतात. नाहीं तर फिरकतसुद्धां नाहींत.

पृ. ४९ ओ. ८ व ९ जगात......शरा !–समोर स्तुति व मागें निंदा हा जगाचा स्वभाव आहे.

.. ... १० ते १३ यात सूर्याचे गुण सांगितले आहेत. त्याची कोणत्याहि ठिकाणीं आसक्ति नसते. तो जीवमात्रांना जीवन देतो आणि कधीं भेदभाव अथवा पक्षपात करीत नाहीं.

.. . १४ सूर्य हा जणू ईश्वराचा येथील प्रतिनिधि म्हणून त्याला 'प्रभुसचिव' असें संबोधिलें आहे.
तो मावळणार म्हणजे विरह होणार. यासाठीं त्याचें मुख धूसर म्हणजे धुळीनें धुरकटल्यासारखें झालें आहे अशी कल्पना.

.. ... १५ कर–( श्लेष आहे ) किरण किंवा हात.
दिवसभर सूर्याचा ताप प्रखर असतो म्हणून तो न्याय-निष्ठुरतेनें कारभार करतो. परंतु सायंकाळीं निरोप घेताना तो सौम्य होतो म्हणजे दया दाखवितो अशी कल्पना.

.. ... १६ व १७ जणू काहीं चंद्रावर काम सोंपवून सूर्य सेवानिवृत्त होतो अशी कल्पना.

लावण्या व पोवाडे यांचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला होता. त्याचप्रमाणें ऐतिहासिक पत्रव्यवहार व मराठेशाहींतील बखरींचा त्यांचा व्यासंग होता. या दांडग्या वाचनामुळें शब्दसंपत्तीच्या बाबतींत ते श्रीमंत व समृद्ध होते. आपल्या काव्यांत व नाटकांत त्यांनीं ती मुक्तहस्तानें उधळली आहे. गोविंदाग्रजांच्या भाषेचें वळण एकदम नवें व निराळें आहे. अनेकांनीं तिचें अनुकरण केलें, परंतु एकहि यशस्वी झाला नाहीं.

गोविंदाग्रजांना लहानपणापासूनच कवितालेखनाचा छंद होता. १९१२ पासून पुढें सहा-सात वर्षें मराठींतील सुप्रसिद्ध मनोरंजन मासिकांत अगदीं पहिल्या पानावर त्यांची कविता असे. त्या काळची रसिकांची पिढी गोविंदाग्रजांच्या कवितांनीं भारलेली होती. लवकरच त्यांचीं प्रतिभासंपन्न नाटकें पुढें आलीं; आणि मग बाळकराम या नांवानें विनोदी लेखमालाहि प्रसिद्ध होऊं लागली. या त्यांच्या त्रिविध वाङ्मयावर महाराष्ट्रांतील रसिकजन बेहद खूष होते. ह्यावरून गोविंदाग्रजांच्या लोकप्रियतेची कल्पना येईल.

कल्पकता हा गोविंदाग्रजांच्या प्रतिभेचा प्रमुख गुण होय. त्यांच्याइतका कल्पक दुसरा कोणी झाला नाहीं. त्यांची कल्पनाशक्ति जितकी सूक्ष्म, तरल तितकीच उंचावर भराऱ्या मारणारी होती. तिच्यांत जशी विविधता तशीच नवीनताहि होती. त्यांच्या वाङ्मयांत सर्वत्र तिचा संचार आढळतो. कल्पनांच्या बाबतींत ते यथार्थत्वानें कुबेर होते.

गोविंदाग्रजांना फार आयुष्य लाभलें नाहीं. त्यांचा लेखनकालहि सात आठ वर्षांपेक्षां अधिक नाहीं. परंतु येवढ्या अल्प काळांतहि गुणदृष्ट्या अमोल साहित्य निर्माण करून त्यांनीं आपलें नांव अजरामर केलें आहे. मराठी भाषेवर त्यांचें अतोनात प्रेम होतें. त्यांची प्रतिमा खरोखरच अलौकिक होती. आयुष्यांत अनेक कटु प्रसंगांना तोंड द्यावें लागल्यामुळें त्यांच्या कांहीं उत्तम काव्यांत एक प्रकारची उदासरम्य छटा आढळते व करुण कोमल सूर कानीं पडतात. अशा कवितांत खऱ्या खऱ्या भावनाप्रधान गोविंदाग्रजाचें दर्शन होते. त्यांच्या अनेक लोकप्रिय कवितांत बुद्धीचा चमत्कार आहे. त्या कविता रिझवतात हें खरें, परंतु त्यांच्या भावनाप्रधान कवितांप्रमाणें त्या हृदयांना स्पर्श करीत नाहींत.

**३० एखाद्याचें नशीब :**

निसर्गांतील कांहीं दृश्यांचा दृष्टान्तासारखा उपयोग करून या कवितेंत कवीनें आपलें भग्न अंतःकरण अतिशय काव्यमयतेनें उघड केलें आहे.

असूनहि मृतवत् आहे. हें पाहून तें पुन्हां केव्हां जिवंत होणार अशी कवि परमेश्वरापाशीं पृच्छा करीत आहे.

पृ. ५१ ओ. ३ — न्यून—उणीव, कमतरता.

.... ... ६ — (येथून पुढें कडवीं ३, ४ व ५ मध्यें ज्यांचा पुन्हां विकास होतो अशा वस्तूंचीं उदाहरणें दिलीं आहेत.)

पृ. ५२ ओ. ६ — नेणता बालक—अजाण मुलगा.

... ... ७ — जीवन्मृत मानस—जिवंत असूनहि निराशेमुळें मृतवत् असणारें हृदय.

३३ परमाणूंचें कार्यमाहात्म्य :

या कवितेंत कवीच्या तरल कल्पकतेचें, सूक्ष्म निरीक्षणाचें आणि तत्त्व-संशोधनाचें दर्शन घडेल. परमाणू म्हणजे वाळूचे कण. ते यःकश्चित् दिसतात. परंतु तेच अनंत काळाचें मापन कसें करतात तें या कवितेंत कवीनें दाखविलें आहे.

पृ. ५२ ओ. ३ — घटिकायंत्र—पूर्वीं दोन टोकाला दोन गोळे परंतु मध्यें लांब नलिका असलेलें कांचेचें एक घड्याळ असे. त्यांत वाळूचे कण भरून वेळ पाहात. त्यास येथें 'घटिकायंत्र' म्हणजे 'घड्याळ' असें म्हटलें आहे.

... ... ७ — अनंतर—नंतर.
परिमाण—माप.

... ... ८ — येथें शब्दचमत्कार व कल्पनाचमत्कार आहे. काळ म्हणजे वेळ हा अनंत खरा. परंतु दिवसांत प्रत्येक घटिकेगणिक घड्याळांत त्याचा अंत होत असतो. कण ती घटका मोजतात.
घटका भरणें—अंतकाळ ठेपणें.

पृ. ५२ ओ. ९ व १० — यांत कवीचा विनय व्यक्त झाला आहे. आपलें काव्य-लेखन अनंतकाळ टिकणारें नाहीं. क्षुद्र आहे. याची कवीला जाणीव आहे. परंतु तें पुसून जाऊं नये म्हणून तो त्यावर वाळूचे कण पसरतो. कारण ते अनंत काळाची भरणारी घटका मोजणारे आहेत.

पृ. ५० ओ. १ स्वर्गांगना—देवता.
... ... २ काहीं . हृन्मंदिरीं—म्हणजे रसिक आपल्या हृदया-जवळील कोटाच्या भागात तीं खोवून ठेवतो.
.. ... ३ पापापदा—( पाप + आपदा ) पाप व संकट.
... ... ५ हेमप्रभाशीतला—शीतल बर्फाची कांति.
... .. ८ जळती ज्वाञानदी—म्ह० लाव्हा
... .. ९ झाडें . याचती—झाडें नव्यानेंच फुटलेलीं दोन पानें ( आपण हात जोडतो त्याप्रमाणें ) जोडून दयाची याचना करतात.
फुटलें—( हें पत्रयुग्माचें विशेपण )
. ... ११ सारीं पालवती—झाडें पानानीं बहरतात.
. .. १४ दु खार्णवीं—दु'खाच्या समुद्रात.
.. १५व१६ अशा चिरनिराश हृदयाला देवाच्या दयेपेक्षा दुसरा कोणता बरें आसरा आहे ? अर्थात् नाहीं.

## ३१ विरामचिन्हें

इग्रजी साहित्याच्या सपर्कानें मराठींत विरामचिन्हें आलीं त्याना पाहून कल्पना स्फुरली ती मात्र गोविंदाग्रजानाच. तरल व अमोघ कल्पनाशक्तीचें हें साक्षात् उदाहरण आहे. या कवितेंत गोविंदाग्रजानीं शैशव, कौमार्य, तारुण्य, प्रौढत्व आणि वार्धक्य या मानवजीवनातील निरनिराळ्या अवस्थावर निरानिराळ्या विरामचिन्हाचे आरोप करून बुद्धीचा चमत्कार दाखविला आहे.

पृ. ५० ओ १ जीवनावर लेखाचें रूपक.
पृ. ५१ .. ३ भकणें—बड्बडणें, वेड लागल्याप्रमाणें करणें.
दृक्—डोळे
... ... १० दिक्कालादि अनंतरूप—दिशा, काळ इत्यादि निसर्गातील दृश्यें हीं अनंताचींच म्हणजे परमात्म्याचींच रूपें आहेत.
... १५ चिर—( म्ह० ) कायम, निरंतर.

## ३२ पुनर्विकसन :

गोविंदाग्रजाचें हताश हृदय उलगडणारें हें एक करुण गीत आहे. निसर्गात कवीला सर्व वस्तूना पुनर्जन्म असलेला आढळतो. परंतु आपलें हृदय मात्र जिवंत

असूनहि मृतवत् आहे. हें पाहून तें पुन्हां केव्हां जिवंत होणार अशी कवि परमेश्वरापाशीं पृच्छा करीत आहे.

पृ. ५१ ओ. ३ न्यून—उणीव, कमतरता.

.... ... ६ (येथून पुढें कडवीं ३, ४ व ५ मध्यें ज्यांचा पुन्हां विकास होतो अशा वस्तूंचीं उदाहरणें दिलीं आहेत.)

पृ. ५२ ओ. ६ नेणता बालक—अजाण मुलगा.

... ... ७ जीवन्मृत मानस—जिवंत असूनहि निराशेमुळें मृतवत् असणारें हृदय.

**३३ परमाणूंचें कार्यमाहात्म्य :**

या कवितेंत कवीच्या तरल कल्पकतेचें, सूक्ष्म निरीक्षणाचें आणि तत्त्व-संशोधनाचें दर्शन घडेल. परमाणू म्हणजे वाळूचे कण. ते यःकश्चित् दिसतात. परंतु तेच अनंत काळाचें मापन कसें करतात तें या कवितेंत कवीनें दाखविलें आहे.

पृ. ५२ ओ. ३ घटिकायंत्र—पूर्वी दोन टोकाला दोन गोळे परंतु मध्यें लांब नलिका असलेलें कांचेचें एक घड्याळ असे. त्यांत वाळूचे कण भरून वेळ पाहात. त्यास येथें 'घटिकायंत्र' म्हणजे 'घड्याळ' असें म्हटलें आहे.

... ... ७ अनंतर—नंतर.

परिमाण—माप.

... ... ८ येथें शब्दचमत्कार व कल्पनाचमत्कार आहे. काळ म्हणजे वेळ हा अनंत खरा. परंतु दिवसांत प्रत्येक घटिकेगणिक घड्याळांत त्याचा अंत होत असतो. कण ती घटका मोजतात.

घटका भरणें—अंतकाळ ठेपणें.

पृ. ५२ ओ. ९ व १० यांत कवीचा विनय व्यक्त झाला आहे. आपलें काव्य-लेखन अनंतकाळ टिकणारें नाहीं. क्षुद्र आहे. याची कवीला जाणीव आहे. परंतु तें पुसून जाऊं नये म्हणून तो त्यावर वाळूचे कण पसरतो. कारण ते अनंत काळाची भरणारी घटका मोजणारे आहेत.

मषि—शाई.

## १२ बालकवि ( १८९०–१९१८ ) :

बालकवींचें संपूर्ण नाव त्र्यंबक बापूजी ठोमरे. खानदेशात त्याचे वडील पोलीस खात्यात होते. त्याच्या वारंवार बदल्या होत. त्यामुळें बालकवींच्या एकंदर शिक्षणाची फार हेळसांड झाली.

बालकवींचा अगदीं बालवयात ' वनवासी ' या कवींशीं संबंध आला. त्यामुळें त्याच्या आरंभींच्या कवितांना जुनें वळण लागलें होतें. परंतु पुढें १९०७ सालीं त्या काळचे एक प्रसिद्ध कवि डॉ. कीर्तिकर यांच्या अध्यक्षतेखालीं जळगावास एक कविसंमेलन भरलें. त्यात् बालकवींनीं आपल्या काहीं कविता म्हणून दाखविल्या. त्या कविता संमेलनात उपस्थित असलेल्या रेव्हरंड टिळक, माधवानुज, विनायक इत्यादि प्रथितयश कवींना अतिशय आवडल्या. तेव्हा बालकवींच्या प्रतिभेचा गौरव म्हणून डॉ. कीर्तिकरांचे हस्तें त्याना जरीच्या वस्त्राचें एक पान व बालकवि ही पदवी अर्पण करण्यात आली.

नंतर दोन वर्षांनीं म्हणजे १९०९ मध्यें डॉ. कीर्तिकर यांच्याच अध्यक्षतेखालीं बडोद्यास महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें अधिवेशन भरलें होतें. त्याला बालकवि व रे. टिळक उपस्थित होते. तेव्हा बालकवींनीं टिळकांपाशीं नगरास राहावें आणि शिक्षण घ्यावें असें ठरलें. त्याप्रमाणें बालकवि नगरास टिळकांकडे राहू लागले. त्यानीं निदान मॅट्रिक तरी व्हावें अशी टिळकांची इच्छा होती. परंतु बालकवींना मधूनमधून उदास होण्याचा मनोविकार होता. त्यामुळें ते आपला शिक्षणक्रम अखेरपर्यंत पार पाडू शकले नाहींत.

नगरास बालकवींचा संबंध अनेक मिशनऱ्यांशीं आला. त्याचे मराठी पंडित म्हणून त्याना उन्हाळ्यात अनेकदा महाबळेश्वराच्या थंड हवेंत राहण्याची संधि सापडली. तेथील सृष्टिशोभेचें निरीक्षण करण्यात त्यानीं दिवसच्या दिवस घालविले. अरुण, संध्यारजनी, निर्झर, फुलराणी इत्यादि काव्यविषय त्याना महाबळेश्वराच्याच प्रवासात आणि परिसरात स्फुरले आहेत.

परंतु बालकवींचें नगर येथील वास्तव्य स्थिर राहिलें नाहीं. ते मध्यंतरीं दोनदा म्हणजे १९११ व १९१४ मध्यें पुण्यास जाऊन राहिले होते आणि तेथें जुळलें नाहीं कीं ते पुन्हा नगरास परत येत. १९१७ मध्यें ते पुण्याहून नगरास परत आले आणि मिशनस्कुलात मास्तर झाले. परंतु पुढें एक वर्षानेंच

ते जळगांवाला गेले असतांना भादली स्टेशनजवळील लेव्हल क्रॉसिंगजवळ आगगाडीखालीं सांपडून त्यांना अपघाती मृत्यु आला.

बालकवींनीं सृष्टिसौंदर्यवर्णनपर कविता बहुसंख्येनें लिहिल्या असून त्यांच्यामुळेंच आधुनिक मराठी कवितेंत त्यांचा नांवलौकिक आहे. बालकवींचा निसर्ग हा चालता बोलता चैतन्यमय आहे. त्यावर त्यांनीं मानुषी भावनांचा आरोप केला आहे. मात्र त्यांत सखोल चिंतन आढळत नाहीं. याला कारण कदाचित् त्यांचा बालवयांतील अकालिक मृत्यु असावा.

बालकवींच्या कवितेचा एक फार मोठा गुण म्हणजे तिच्यांत निसर्गाच्या देखाव्याचीं यथातथ्य वर्णनें आढळतात. बालकवींच्या शब्दांत एकप्रकारची जादू आहे. त्यांच्याद्वारें रूप, शब्द, गंध व स्पर्श या ज्ञानेंद्रियांच्या सूक्ष्म आणि तरल गुणांचाहि अनुभव घडतो.

बालकवींची भाषा नुसतीच सुंदर नाहीं तर मधुर व मृदुल आहे. त्यांच्या रचनेंत सर्वत्र कोमल वर्ण कानीं पडतात. पुन्हां तिच्यांत प्रसाद हा फार मोठा गुण आहे. सारांश, मराठी कवितेच्या प्रांतांत बालकवींचें स्वतःचें असें एक स्वतंत्र स्थान आहे.

**३४ तडाग असतों तर —**

या कवितेंत बालकवींनीं एका प्रशान्त चांदण्या रात्रीचें व सरोवरांतील तिच्या प्रतिबिंबाचें चित्रमय वर्णन केलें आहे. तडाग म्हणजे तलाव.

पृ. ५३ ओ. १ — चंद्रिका म्हणजे चंद्राचा प्रकाश, चांदणें. बालकवींना बहुधा चंद्र अभिप्रेत असावा.

... ... ३ — दिव्यलोक—स्वर्ग.

... ... १० ते १२ आकाशांत फुललेल्या चांदण्यावर सौंदर्याच्या वेलीचा आरोप केला असून चांदण्यांवर फुलांची कल्पना केली आहे.

... ... १६ — निर्भर आनंदांत—पूर्ण आनंदांत.

... ... १७ — रम्य दिव्य तें ( दृश्य )—चांदण्या रात्रीचा देखावा.

... ... १८व१९ कल्पना व अभिव्यक्ति यांच्या चारुतेच्या दृष्टीनें या दोन्ही ओळी उल्लेखनीय आहेत. आपण जर चांदरात असतों तर वातावरणांतली ही शांतता अशीच हृदयांत धरून बसलों असतों ही कल्पना खरोखरच कमनीय आहे..

पृ. ५६ ओ. ८ 'लाल्या लाला'—हें आईचें लाडाचें हांका मारणें आहे.

... ... १० पाचूचे पंख—पांच हिरवी असते त्याचप्रमाणें गवताचीं पातीं हिरवीं असतात. तीं पातींच त्यांचे पंख होत.

... ... ११ धालों—आनंदित झालों.

... ... १२ पवनाचा आंदोल—वाऱ्याचा झोंपाळा. देवदूतांची कल्पना इंग्रजी साहित्याच्या संपर्कानें आपल्याकडे आली आहे. देवदूतांना पंख असतात व ते तेजस्वी असतात. ते लहान मुलांच्या भोंवतालीं राहून त्यांना सांभाळतात अशा समजुती आहेत. बालकवींनीं येथें त्या कल्पनेचा उपयोग करून घेतला आहे.

... ... १६ व १७ गवत जसें डोंगरावर तसें दरींतहि उगवतें त्यावर कल्पना.

... ... १८ ते २० द्वैतांत म्हणजे दुजाभावांत प्रेमाला जागा नाहीं. आमच्यांत अद्वैत आहे. म्हणूनच आम्हांला सर्वत्र प्रेम दिसतें असें गवताचीं पातीं सांगत आहेत. ( कविता आरंभीं सृष्टिवर्णनपर असली, तरी शेवट तत्त्वज्ञानात केला आहे. )

## १३ माधव जूलियन् ( १८९४–१९३९ ) :

माधव जूलियन् यांचें संबंध नांव माधव त्र्यंबक पटवर्धन. त्यांचें बालपण बडोद्यास व आवळस या त्यांच्या गांवीं गेलें. तेथेंच त्यांचें प्राथमिक शिक्षण झालें. पुढें वयाच्या नवव्या वर्षीं म्हणजे १९०३ मध्यें इंग्रजी शिक्षणासाठीं ते बडोद्यास आपल्या मातुलांकडे राहिले. १९०९ सालीं ते प्रवेश-परीक्षा पास झाले व पुढील उच्च शिक्षणासाठीं बडोदा कॉलेजांत जाऊं लागले. याच सुमारास त्यांची स्वावलंबी वृत्ति व स्वतंत्र स्वभाव प्रकट झाला. त्यांचीं सुधारकी मतें घरांतील वडिलधाऱ्यांना पसंत नव्हतीं. म्हणून ते खासगी शिकवण्या करून राहूं लागले.

पटवर्धनांच्या शेजारीं त्या काळच्या प्रसिद्ध कवयित्री काशीताई हेर्लेकर या राहात होत्या. काशीताई या सुविद्य व प्रगमनशील होत्या. त्यांच्या आचारा-विचारांचा पटवर्धनांवर बराच प्रभाव पडला. त्यांच्या वत्सल मार्गदर्शनानें, टॉडच्या सुप्रसिद्ध *Student's Manual* या ग्रंथांतील उदात्त व उदार

जीवनांत अपत्यांनीं प्रवेश केल्यावर त्यांनीं वत्सलगीतें लिहिलीं आहेत. तीं खरोखरच मनोरम आहेत. उमर खय्यामच्या रुबायांना पटवर्धनांनीं मराठी वेष चढवला आहे. फिट्झेरल्डचे इंग्रजी भाषांतर हें मुळास धरून नाहीं. परंतु पटवर्धनांचें भाषांतर हें मुळाबरहुकूम आहे हें विशेष. शिवाय त्यांनीं फिट्झेरल्डच्या भाषांतराचेंहि भाषांतर केलें आहे.

पटवर्धनांची भाषा सर्वस्वी स्वतंत्र आहे. आरंभीं आरंभीं त्यांच्या कवितेंत फारशी शब्दांचा फाजील भरणा असे. परंतु पुढें ते भाषाशुद्धीच्या चळवळी-कडे वळले, आणि अर्थपूर्ण व काव्यास अनुरूप असे शब्द केवळ परकी म्हणून काढूं लागले. पटवर्धनांनीं आपली कविता आविष्कृत झाल्यानंतर अनेकदां सुसंस्कृत व परिष्कृत केली आहे. त्यांच्या कवितेंतला भाव साधा व सरळ आहे. तो एकदम अंतःकरणाची पकड घेतो. त्याची रचना रेखीव आहे. तिच्यांत दोष सहसा आढळणार नाहीं.

**३८ अज्ञात नाथास :**

आत्यंतिक संकटात मनुष्याच्या बुद्धीला अनेकदां ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल शंका येऊं लागते. त्याच्या मनाची स्थिति दोलाचल होते. कारण तो स्वतः अपूर्ण आहे. एकदां त्याला असें वाटतें कीं ईश्वर आहे. तो आपल्याला आधार होईल. परंतु दुसऱ्या घटकेला असें मनांत येतें कीं, तो नसला तर कुठला आधार आणि कुठलें काय ? या करुणापूर्ण गजलांत कवीनें याच मनःस्थितीचें चित्रण केलें आहे. (मुळांत हा गजल सरळ होता. परंतु पुढें कवीनें ' सदाशिव ' हा शब्द घालून पानपतावर ना दिसे झालेल्या भाऊसाहेब पेशव्यांच्या नांवाचा निर्देश केला व त्यांची पत्नी पार्वतीबाई हिच्या मनाची जी स्थिति झाली तीच या कवितेंत व्यक्त झाली आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला. वस्तुतः ही ऐतिहासिक घटना दृष्टिआड करूनहि अर्थ हृदयंगम होतो. )

पृ. ५७ ओ. २ नाथा—परमेश्वरा ( किंवा पार्वतीबाईचा संबंध घेतल्यास सदाशिवरावभाऊ. )

... ... ५ व ६ आपली भावगंगा ही परमेश्वराच्या तीर्थीं स्थिर व्हावी ही इच्छा.

... ... ५ व ६ भावावर गंगेचें रूपक केल्यामुळें ' सदाशिव ' म्हणजे शंकर ( किंवा सदाशिवरावभाऊ पेशवे. )

पृ. ५७ ओ. ९ व १० गंगा हिमालयाजवळून दूर गेली कीं 'काषाय' म्हणजे 'भगवी' होते किंवा (पार्वतीबाईंनीं शोकातुर होऊन घेतलेला वेष.)

... ... ११ भांडार—अंतःकरणातील प्रीतीचा साठा लुटण्याकरिता.

... ..... १२ सौभाग्य—(मनातलें) पतिप्रेम.

... ... १५ काळीज धुग्धुगे—मन हुरहुरतें.

... ... १७ मग्दूर—सामर्थ्य.

... ... २० सामीप्य—सान्निध्य ('सामीप्य' या नावाची मुक्ति).

... ... २४ 'माये' ('मावे' हवें)

मनात प्रेमाची वसति असली म्हणजे त्यात मरणाच्या भीतीला स्थान नसतें.

## ३९ साशीर्वाद निरोप :

कवि एकदां कामात गर्क असताना त्याचा लहान मुलगा 'ताता, ताता' म्हणजे 'तात्या, तात्या' असें हाका मारीत त्याच्याकडे आला. कवि कामांत असल्यामुळें त्याच्यावर चिडला. त्यामुळें मुलगा हिरमुसला. परंतु कवीला आपल्या या कृतीचा पश्चात्ताप झाला त्याचें हें करुणवत्सल चित्र आहे.

पृ. ५८ ओ. ४ कोणीकडे—(म्ह०) कुठेंतरी, वाट फुटेल तिकडे.

... ... ५ कवीला स्वत:ला आपोआपच वाईट वाटलें. त्याचें वर्णन 'पाठीवर कडाडून चाबूक बसला' असें केलें आहे.

... ... ७ आधीं आपण मुलावर चिडलों याचें कवीला वाईट वाटलें. पुन्हा त्यात त्याला मुलाच्या अंगात किंचित् कसर लागते त्यामुळें तो अधिकच हळुवार होतो.

... ... ९ व १० लहान मुलें एखादी गोष्ट लवकर विसरतात. पण जाणीव व जबाबदारी यामुळें मोठ्या माणसाच्या मनांत कांहीं गोष्टी कायमच्या घरें करून राहतात.

... ... १२ कवीचें वात्सल्य.

... ... १३ स्यात करावया—नाव काढण्यास, कीर्ति मिळविण्यास. पुढें—मोठेपणीं.

खंत न—(मग मला) वाईट वाटणार नाहीं.

४० रामद्वारीं :

अयोध्येच्या रामाच्या मंदिरांत नथ्थूभटजी मढीकर या नांवाचे महाराष्ट्रीय होते. त्यांना एकदां महाराष्ट्रीय यात्रिकरूने आपण कोण ? कुठले ? म्हणून पृच्छा केली. तेव्हां त्यांनीं रामाच्या मूर्तीकडे बोट करून रामरक्षेतील 'माता रामो' हा श्लोक म्हटला. पटवर्धनांना ही गोष्ट कळली असतांना प्रस्तुत काव्य स्फुरलें. त्यांत कवीची भाविकता दिसते. कवीच्या मनावर पूर्वी जे संस्कार झाले ते पुसले गेले नाहींत., ही कविता पटवर्धनांनीं आपल्या शेवटल्या दिवसांत लिहिलेली आहे.

| | |
|---|---|
| पृ. ५८ श्लो. २ | ध्यान—( रामाची ) मूर्ति. |
| ... ... ८ | माधुरी—गोडी ( परमुलखात आपल्या मुलखातला आपली भाषा बोलणारा गेला म्हणजे जो आनंद होतो तो खरोखर अपूर्व असतो. ) |
| ... ... ९ | गोदातटीचे—म्ह० नाशिक किंवा पैठणचे;महाराष्ट्रांतले. |
| ... ... ११ | कानपुरांत—हा उल्लेख साभिप्राय असावा. कारण कानपूर ब्रह्मावर्तापाशीं आहे. शेवटच्या बाजीरावांबरोबर अनेक महाराष्ट्रीय तिकडे गेले. परंतु पुढें १८५७ चें समर झाल्यावर अज्ञातांत, देवळांतून व मठांतून राहूं लागले. |
| ... ... १६ | चर्या पालटे—त्याला ते प्रश्न मानवले नाहींत; तो पूर्ण विरागी होता. |
| ... ... १७ ते २० | हा रामरक्षेतील श्लोक आहे. ' राम माझी आई आहे. रामच माझा पिता आहे. ' राम स्वामी आहे. रामच माझा सखा आहे. माझें सर्वस्व दयाळू राम आहे. मला इतर कांहीं ठाऊक नाहीं, नाहीं, नाहीं. ' |
| ... ... २२ | विवक्षा—इच्छा ( तीच म्हणजे वरील श्लोकांत असलेली इच्छा माझ्या मनांत प्रादुर्भूत झाली. ) |
| ... ... २४ | माझें लक्ष रामाकडे आहे. तोच माझी आशा आहे. |